मनोहर ग्रंथमाला, प्रकाशन २८ वें

# पालापाचोळा

( लघुनिबंधसंग्रह )



लेखक

न. चिं. केळकर



१ फेब्रुवारी १९४३



किंमत १॥ रु.

# अनुक्रमणिका

# मोटारीचे कर्णे १

मीं परवां एक दिवस घरीं गाण्याची मैफल केली होती. साथीचीं सर्व हत्यारें उत्तम होतीं. तीं वाजविणारे कुशल होते. आणि गाणाराचा लौकिक तर शास्त्रीय ज्ञानापेक्षांहि सुरेलपणाविषयीं अधिक होता. जसा अबदुल करीमखां, किंवा हिराबाई बडोदकरीण, किंवा रहिमतखांच म्हणाना! श्रोतेमंडळीहि निवडक व रंगणारी. सगळं जुळलं पण एक चुकलं! मैफलीची वेळ, जागरण नको म्हणून, संध्याकाळची धरली होती.

सुमारें अर्धा तासपर्यंत गाण्याला असा कांहीं रंग भरला कीं बोलायची सोय नाहीं. इतक्यांत गवईबुवांनीं चढ्या सुरांत धैवतावर स्वर खेचायला आणि रस्त्यावरनं जाणाऱ्या एका मोटारीचा कर्णा वाजायला एकच गाठ पडली. तो आवाज गवयाच्या स्वराशीं इतका कांहीं बेसूर व कर्कश होता कीं या विसदृशपणानें श्रोत्यांचा विरस होऊन त्यांनीं उद्गारयुक्त तोंडें वाकडीं केलीं. कांहींना इतका राग आलेला दिसला, कीं त्या क्षणीं ड्रायव्हरच्या तोंडापर्यंत यांचा हात पोंचता तर त्याचा गाल चांगलाच सुजला असता किंवा कर्ण्यापर्यंत हात पोंचता तर त्याचा चुराडा झाला असता.

पण क्षणार्धानें या विक्षेपामुळें आलेला राग जाऊन सर्व मंडळी हसूं लागली. कोणाचा आलेला राग, ज्याचा त्याजवर किंवा इतर कोणावर, काढतां आला नाहीं म्हणजे त्या ऊर्मीचा लय हास्यांत होतो असें विनोदशास्त्र सांगतेंच नव्हे का ?

पण हें एवढ्यावर थांबलें नाहीं. झालें असें कीं मैफलीची जागा लक्ष्मी रोडवर होती, आणि वेळ तिपारचा सिनेमा ( मॅटिनी ) संपून संध्याकाळीं प्रेक्षक परत फिरण्याची होती.

नंतर फिरून फिसकटलेलें गाणें सुरू झालें. पण दोन मिनिटें जातात तोंच दुसऱ्या एका मोटारीच्या कर्ण्यानें असाच बेरंग केला. फिरून राग व नंतर फिरून हशा. दर दोन तीन मिनिटांनीं असें होऊं लागल्यावर गवईबुवा उंच तान घेऊन सुरेल आवाज केव्हां काढतात याची प्रतीक्षा करण्याऐवजीं, ते बेसुरी कर्णे केव्हां ऐकूं येतात याचीच प्रतीक्षा श्रोते करूं लागले. शेवटीं कंटाळून मी मैफल पंधरावीस मिनिटें थांबवून कॉफी आणवली.

ती पितांना एकजण म्हणाला, “ सरकारानें नियम करावा कीं फक्त सुरेल कर्णेच मोटारीला लावावे.”

त्यावर दुसरा म्हणाला, “ पण ते कर्णे सुरेल करतांना आधीं स्थायी स्वर कोणता धरावा ? एखादा स्टँडर्ड वीणा व स्टँडर्ड स्वर यांचा मक्ता देणार कीं काय कुणाला ?”

“ स्थायी स्वर असा मुळीं नसतोच कधीं तंबोऱ्यांतहि. एकाच बैठकींत चारजण गाणारे असले, तर एकाच सुरांत लावलेला तंबोरा सर्वांना चालत नाहीं. प्रत्येकजण आपल्या चढ्या किंवा खालच्या सुराला तो लावून मगच गातो.”

“ आणि पेटीचे स्वर तर विचित्रच ! कारण त्यांत कोणताहि स्थायी स्वर ‘सा’ म्हणून धरला तर, त्याला अनुसरून निघणारे सप्तस्वर जवळ जवळ सुरेल असावे अशा बेतानें, थोडा दोष पत्करूनच, घासून तयार केलेले असतात. म्हणून त्यांतील कांहीं स्वर अशुद्ध विकृत असतात. त्याला ‘टेंपर्ड’ स्केल म्हणतात. म्हणजे तें समर्थनहि टेंपर्डच ! ”

" तरी गाणारा म्हणतोच पांढरी तिसरी पट्टी धरा, नाहीं तर काळी चवथी धरा! मग यांचें गाणें सुरू व्हायचें."

" आणि म्हणूनच आधीं तंबोरा लावीत नाहींत. तर जिथें पेटीची साथ असते तिथें आधीं गळ्याला जुळेल तो पेटीचा स्वर धरून मग तंबोऱ्याचे षड्ज पंचम लावतात."

" पण नुसती पेटी किंवा स्वरसप्तक घेतलें तरी सगळे स्वर परस्परांना संवादी होत नाहींत ना? षड्ज पंचम किंवा षड्ज मध्यम हेच काय ते वाटेल त्या सप्तकांत परस्परसंवादी ठरतात. म्हणून एकदम वाजवितां येतात व सुरेल ठरतात. 'रिखभ' व 'गंधार' हे एकदम वाजविले तर बेसूर ठरतात, तसेंच 'धैवत' व 'निषाद'! पाठोपाठचे बंधुच, पण भांडखोर!"

" आणि कोमल स्वरांची त्यांत भर पडली म्हणजे मग काय? अध कोमल, अति कोमल हे स्वर पेटींत नसतात—म्हणून तर बावीस चोवीस श्रुतींच्या पेट्या निघाल्या आहेत."

" आणि बेसुरी पेटीचे हे दोष लक्षांत घेऊनच रेडियोच्या कार्यक्रमांत हार्मोनियमवर बहिष्कार घालण्यांत आला आहे म्हणे!"

" मग आतां बोला. कोणत्या एका सुरांत वाजणारे मोटारीचे कर्णे करावे?"

तात्पर्य, सार्वजनिक रस्त्याजवळ बसून मैफली करणारांना ही बेसुरेलपणाची, ही विसंवादी विवादी स्वर कानांवर पडण्याची आपत्ति पत्करलीच पाहिजे नव्हे का?

पण गाण्यांतील विसंवादाचें राहो. साध्या संभाषणांत तरी संवादित्व हटकून लाभतें का?

माझ्या एका मित्राला एक सवय होती. दुसऱ्या कोणाशीं बोलूं लागला म्हणजे प्रथम आपलें म्हणणें सविस्तर सांगितल्याबरोबर तो म्हणायचा 'बोला आतां!' अपेक्षा ही कीं उत्तर येईल तें याच्या मनासारखें, याच्या बोलण्याचें समर्थन करणारेंच येणार किंवा यावें.

पण हळूहळू त्याला अनुभव वेगळाच आला. उदा०—

( १ ) प्र.—“ परवां मीं मंडईत हमालीणबाईला म्हटलं, मी तुला पाटी उचलायला हात लावतों. तुझे श्रम वांचतील. पण तिनें नाकारलें. बोला आतां ? ”

उ०—“ बोलायचें काय ? पाटी उचलून देतांना तुमचीं बोटें आपल्या गालांना लागतील अशी भीति तिला वाटली असेल. ती फाजील विनयशील किंवा फाजील चावट असेल. दुसरें काय ? ”

( २ ) प्र०—“ परवां मीं कमिशनरसाहेबांकडे मुद्दाम जाऊन युद्ध-फंडाला एक हजार रुपयांची वर्गणी देतों म्हणालों. पण साहेब म्हणाले— जा तिकडे. मामलेदारकचेरींत जाऊन भरा. बोला आतां ? ”

उ०—“ बोलायचें काय ? कमिशनरला भीति पडली असेल कीं आज वर्गणी देऊन उद्यां रावबहादुरीची पदवी मिळविण्याकरितां अर्ज नेऊन त्याच्यापुढें ठेवाल. ती भीड पडायला नको असेल त्याला. म्हणून त्यानें तुमची वर्गणी तर मिळावी, आणि भीड पडूं नये, या दुटप्पी हेतूनें तुम्हांला टोलविलें असेल झालं बड्या साहेबानं, दुसरं काय ? ”

( ३ ) प्र०—“ परवां सिनेमा थिएटरांत चमकाबाई थोडया उशिरा आली. सगळया खुर्च्या भरलेल्या होत्या. म्हणून माझ्या शेजारच्या खुर्चीवर मीं आमच्या बाळयाला बसविला होता त्याला उचलून घेतलें, व रिकाम्या झालेल्या खुर्चीकडे हात दाखवून बसा अशी खूण केली. पण त्या ढालगज भवानीनें माझ्याकडे एकवार रोखून पाहिलें, आणि ही सोईची जागा सोडून ती दूरच्या एका बाकावर जाऊन बसली. बोला आतां ! ”

उ०—“ बोलायचें काय ? चमकाबाईनें तुमच्याकडे रोखून पाहून जागा नाकारली यावरूनच काय तें समजा ! तिला शेजारीं बसवून घेण्याची इच्छा तुम्हांला झाली. पण तुमच्या सन्निध बसणें तिला धोक्याचें वाटलें असेल तर ! ”

'बोला आतां' अशा प्रश्नाला इंग्रजींत Question of appeal म्हणतात. म्हणजे तो प्रश्न विचारणाराचा आशय असा असतो कीं दुसऱ्यानें त्याचें उत्तर 'होय, अगदीं बरोबर' असें थोडक्यांत नेमकें देऊन याचें संवादी समर्थन करावें. पण ज्याला आपल्या सयुक्तिक वर्तनाचा किंवा तर्कशुद्धतेचा इतका आत्मविश्वास वाटतो त्यानें दुसऱ्याकडून 'होय बरोबर' अशा हुकमी उत्तराची अपेक्षा तरी कां करावी? तें अपील एखादे वेळीं फुकट जावयाचें. नामंजूर व्हावयाचें!

पण नाहीं. मनुष्य हा संवादित्वाचा भुकेलेला असतो. गाण्यांतल्या स्वरांप्रमाणेंच हें संभाषणांतलें प्रश्नोत्तरांचें संवादित्व म्हणाना!

संवादित्वाच्या अपेक्षेचा दुसराहि एक प्रकार संभाषणांत आढळतो. एका मित्राला वाटतें कीं, आपण बोललों तें यथार्थ समर्पक आहे. पण याचें समर्थन तो दुसऱ्याच्या तोंडच्या उत्तरानें मागत नाहीं, तर हात पुढें करून टाळीनें मागतो. जर खरोखरच दुसऱ्याला त्या पहिल्याचें बोलणें अगदीं ततोतंत व एकदम 'होय' म्हणण्यासारखें पटलें असेल तर, त्याला पहिल्याच्या उघडया तळहातावर टाळी दिल्याशिवाय राहवत नाहीं. पण पुष्कळदां असें होतें कीं ही टाळी पडत नाहीं. कारण त्याचें बोलणेंच जर याच्या मनाला पटलें नाहीं तर टाळी द्यायला याचा हात वर उचलणार कसा? आणि टाळी घेण्याकरितां हात पुढें करावा पण त्यावर ती न पडल्यानें तो माघारा घ्यावा लागावा—यासारखी लज्जास्पद, हास्यास्पद, मानहानिकारक गोष्ट त्या वेळीं दुसरी कोणतीच नसते.

लग्नांत वधूच्या हातची माळ गळयांत पडण्याच्या अपेक्षेनें वरानें मान पुढें करावी, पण वधूच्या हातीं माळच नसावी किंवा ती हातांतल्या हातांत तुटून पडावी, यानें वराची जी स्थिति होत असेल तीच टाळी घेण्याकरितां पुढें केलेला हात मागें घेणाराची होते!

मिळून काय? संवादित्व नाहीं! काम बेसुरेल झालें!

अशा साध्या गोष्टींतहि संवादित्व साधत नाहीं! आणि मनुष्य अपेक्षा करणार सर्व लोकमतानें माझ्या मताच्या गाण्याची सुरेल संवादी

साथ करावी. मित्र मित्राला संभाळून घेऊं शकत नाहीं—म्हणजे 'होय बरोबर' असें अपेक्षित संवादी उत्तर मतभेदामुळें देत नाहीं—'बोला आतां' हा प्रश्न फुकट जातो—! मतभेद असूनहि केवळ मित्रत्वाकरितां हातावर नुसता हात मारायचा तो मारीत नाहीं ! लग्नांतली साहित्याची मुख्य तयारी म्हणजे मंगलमाला ती वेळेवर तयार राहत नाहीं —किंवा तुटून पडते! अवघ्या दोन व्यक्तींचा हा व्यवहार! मग 'त्रिविध' म्हटल्या जाणाऱ्या पण खरोखर 'सहस्त्रविध' असणाऱ्या जगाचें पूर्ण संवादित्व आपल्याला सदा लाभावें अशी हा मूर्ख अपेक्षा कशी करणार? जगाचा राजाच कीं नाहीं! आणि राजाला तरी—सीतामाईचा त्याग करणाऱ्या त्या रामाला विचारा!

जग हें बहुविध आहे ही गोष्ट पटविण्याकरितांच, मला वाटतें, पुराणकारांनीं दोन तोंडांची जानस (ग्रीक देवता), तीन तोंडांचा दत्तात्रय, चार तोंडांचा ब्रह्मदेव, दहा तोंडांचा रावण इत्यादि देवता कल्पनेनें निर्माण केल्या असाव्या. या अनेक तोंडांची अडचण स्वतः त्या तोंडांच्या मालकांनाहि झाली नसेल काय? एकाच वेळीं सर्व तोंडांचा उपयोग करतांना चुकून बेसुरेलपणा विसंवादित्व हीं घडून यायचीं!

कारण मनुष्याच्या मनालाहि द्विविधता आहे म्हणतात मानसशास्त्री! म्हणे एक बहिर्मन तर दुसरें अंतर्मन; आणि समजा चुकून असें घडलें, कीं बहिर्मनाचा आशय एक तोंड बोलत असतां त्याच वेळीं अंतर्मनाचा आशय बोलण्याची दुसऱ्या तोंडाला इच्छा झाली तर मोठीच पंचाईत व्हायची कीं! हो! पुष्कळदां आपल्याला शिस्त किंवा भीडमुर्वत यांकरितां खोटें बोलावें लागतें, तोंडदेखलें बोलावें लागतेंच.

समजा, एखादा कवि आपल्या कवितांचें चोपडें घेऊन तुमच्याकडे आला आणि तुम्हांला आपलें काव्यगायन ऐकवूं लागला! आणि तुम्ही बहिर्मनांतली खोटी शाबासकी त्याला तोंडानें देत असतां (तुम्हांला दोन तोंडें असलीं तर), दुसऱ्या तोंडाचा उपयोग करून

अंतर्मन बोलूं लागलें कीं 'काय शुद्ध गाढव आहे पाहा ! हा स्वतःला कवि व गवई समजतो !' तर तुम्हांला दोनहि तोंडांत मारून घ्यावीशी वाटेल ! कोण हा कठीण प्रसंग !

देवतांचें सोडा ! पण द्विमुख माणसाला अडचण खरी ! देव अनेक तोंडांनीं विसंवादी बोलले तरी, शब्दप्रामाण्याच्या शिष्ट-पद्धतीनें, त्या विसंवादाचा संवाद एकवाक्यता करून दाखविणारे नैय्यायिक पंडित भेटतील. पण एकच तोंड असणारावरहि Mr. Facing both ways असा दुतोंडेपणाचा आरोप येऊं शकतो. तर दोन तोंडांच्या माणसावर तो मिथ्या आरोप न ठरतां तें सत्यकथनच ठरेल कीं !

पण देवांना तरी अशीं अनेक तोंडें हवींत कशाला ? एकच तोंड बोलून दमेल म्हणून ? पण तें शक्य नाहीं. परवां रामेश्वरच्या यात्रेहून मी परत येत असतां एक अपूर्व चमत्कार पाहिला. मद्रास स्टेशनावर आमच्या डब्यांत एक मद्रासी चढला. सकाळीं ७॥ वाजल्यापासून शेजारीं मिळेल त्याच्याशीं बोलूं लागला तो रात्रीं अकरा वाजेपर्यंत. आणि इतक्या मोठ्यानें अस्खलित इंग्रजींत, कीं डब्याच्या दुसऱ्या टोकाला तें आम्हांला ऐकूं येई; व शेवटीं 'आतां आम्हांला झोप घेऊं द्या महाराज,' असें आम्हांला त्याला नाजुक पर्यायानें सुचवावें लागलें.

ही अनेक विसंवादी मुखांची अडचण देवादिकांसुद्धां ज्याची त्याला आहेच. पण त्याच्या शत्रूलाहि तितकीच ! ग्रीक पुराणांत हायड्रा नांवाचा नागासुर आहे. त्याला तोंडेंच तोंडें; मानाच माना. त्याला मारायचा म्हणजे किती तरी तोंडांचीं खांडोळीं करायचीं !

असो, आपणाला पौराणिक देवाराक्षसांशीं काय कर्तव्य आहे ? आपला प्रश्न आहे कीं मनुष्यजीवनांतलें विसंवादित्व किंवा बेसुरेलपणा कसा टळेल ? पण त्यांतील अडचणींना, वर दर्शविल्याप्रमाणें, बहिर्मन अंतर्मन यांच्या द्विविधतेपासून, आणि 'दुतोंड्या' माणसापासून प्रारंभ !

आणि आपली तर इच्छा, कीं आपलें आणि जगाचें एकमत, म्हणजे संवादित्व साधावें! सर्व जग एकच मत एकाच तोंडानें बोलूं शकेल तर काय बहार होईल! होईल खरी. पण—

कदाचित् तुम्ही म्हणाल मनाची जातच चंचल; पण व्यक्तिशरीराची गोष्टहि तुम्हांला सांगतों. हेन्री फोर्ड–सुप्रसिद्ध अमेरिकन मोटारवाला–याच्या चरित्रांत वाचलें तें सांगतों. फोर्डच्या कारखान्यांत मोटारीच्या प्रत्येक भागाचें द्रव्य, मोज व माप ठरलेलें असून, तो प्रत्येक भाग आपोआप चालणाऱ्या यंत्रांनीं बनविला जातो. म्हणजे असें कीं प्रथम योजनेनंतर मोटारनिर्मितीच्या कामांत मनुष्यप्राण्याच्या हाताचें काम–किंवा लुडबुड म्हणा–उरतच नाहीं. आणि हें असें आहे म्हणूनच एका दिवसांत ठरीव प्रकारच्या हजारों मोटारी निर्माण होतात. पण त्यांचें पुढें काय होतें माहीत आहे का? तयार मोटारी चालवून पाहण्याचें काम पुढें सुरू होतें. पण त्या चालवून पाहणाराला कांहीं दिवसांनीं असें आढळतें कीं, प्रत्येक मोटारची कांहीं एक ठरीव लकब आहे. याचा अर्थ निर्मितीच्या सर्व गोष्टी ठरीव असतां, प्रत्येक मोटार स्वतः-चा स्वभाव, स्वतःचें व्यक्तित्वच, निर्माण करते म्हणाना! अर्थात् त्या मोटारी चालविणारे तें समजून घेऊनच मग त्या चालवितात. एकाच आईबापांचीं मुलें असतां सगळयांचे चेहरे, लकबी, स्वभाव वेगवेगळे कां असावे? तीं मनुष्यें म्हणून सोडून देऊं. पण यांत्रिक निर्मितींत-हि तसें व्हावें? तात्पर्य, व्यक्तिमत्व–हेंच शेवटीं नियत व अटळ ठरतें. आणि विसंवादित्वाचा बेसुरेलपणाचा संभव सिद्ध होतो.

गाण्याच्या मैफलीच्या प्रारंभीं जुळवून घेतलेली तंबोऱ्याची तार गवयाला मध्येंच गाणें थांबवून खेचून सुरेली करावी लागते. तबला-हि उतरतो. तबलेवाला तालाचा ठेका न बिघडूं देतांच वाद्यांवर ठोके देऊन तो सुधरून घेतो. मिळून काय, हुकमी यांत्रिक गोष्टींतहि संवादित्व, सुरेलपणा संभाळणें कठीण जातें. मग लोकमत एकाच सुरांत निघणें किंवा आपल्या व्यक्तिस्वराशीं तें सुरेल राहणें या गोष्टीची अपेक्षा कां करावी?

मग काय निराश व्हावें? होय! या मोठ्या पराक्रमाविषयीं खुशाल निराश व्हावें. पण एक लहानसें संवादित्व साधण्यासारखें आहे, आणि माणसानें तें मात्र साधावें. तें म्हणजे स्वतःच्या सदसद्बुद्धीशीं संवादी सुरेल राहणें. एका अमेरिकन तत्त्वज्ञानें In Tune with the Infinite हें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यानें प्रतिपादिलें आहे कीं मनुष्यानें अपरिमित ईश्वराशीं सुरेलपणा ठेवावा. पण हें तत्त्वज्ञानी बोलणें झालें. त्याचा व्यावहारिक अर्थ इतकाच—स्वतःच्या परिमित व्यक्तितत्त्वाशीं जो सुरेल राहील त्याच्या पदरांत अनंत अपरिमित ईश्वराशीं सुरेल संवादी राहण्याचें श्रेय लाभेल. आपण हाच आपला ईश्वर! जो स्वतःच्या बुद्धीशीं मनाशीं बेमान होईल तो अनंताशीं सुरेल इमानी संवादित्व कसें पावणार? स्वतःशीं इमानी राहण्यालाच या जगांत माणसाला किती श्रम होतात. तो निश्चयी असेल तरच त्याला, आत्मविश्वासाच्या पकडीनें मनाच्या तारा खेचून, सुरेल करतां येतील. आणि तें साधलें म्हणजे मग लोकमताच्या कर्ण्यांचे बेसूर आवाज कानांवर कितीहि आले तरी त्याचा स्वर ढळत नाहीं, त्याची एकाग्रता समाधि बिघडत नाहीं. आत्मसंतुष्टतेच्या सुरांत व लयींत तो अखंड गात राहूं शकतो; व अशा आत्मनिष्ठ गवयाचें गाणेंहि मग लोक आस्थेनें ऐकतात.

माझ्या लक्ष्मी रोडवरच्या माडीवरील गाण्याची मैफल एकदां बिघडली. दुसऱ्यांदाहि तोच प्रकार झाला. पण कर्ण्यांचा स्वर कानांवर न पडेल असा रस्ता तरी पुण्यांत कोणता मिळणार? आणि मोटारीच्या कर्ण्यांचा आवाज टाळण्याच्या क्षुल्लक कारणाकरितां मीं माझें घर कसें सोडणार?

त्यापुढें आमच्या गाण्याच्या मैफली त्याच जागेंत होत राहिल्या. आणि श्रोतेहि पण कमी झाले नाहींत!

---

## कार्यकारणांची साखळी ! २

माझ्या एका तत्त्वज्ञानी मित्रानें परवां मला एक सूत्र म्हणून दाखविलें ते असें, 'आदीला अंत नाहीं व अंताला आदि नाहीं.' शब्दांची पुनरुक्ति, आलट-पालट, व विरोधात्मक अर्थ हीं लक्षांत घेतलीं तर हें सूत्र चटकदार ठरतें. पण तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें त्याचा अर्थ काय आहे असें मीं त्याला विचारलें तेव्हां त्याची फोड त्यानें अशी केली:—

'आदि म्हणजे प्रारंभ किंवा प्रथमकारण. पण प्रथमकारणाचा शोध करीत करीत तुम्ही कितीहि मागें गेला तरी तो प्रवास संपतां संपत नाहीं. याच्या उलट कोणत्याहि गोष्टीला प्रारंभ होऊन राहिलेला असला म्हणजे मग तिचे एकामागून एक होणारे परिणाम कुठेंच संपत नाहींत. ते परिणाम जगाच्या अंतापर्यंत होत राहणार असें म्हणतां येईल.'

हें म्हणणें यथार्थ आहे असें वाटतें. पाण्यावर उठणाऱ्या लाटांपैकीं प्रत्येक लाट पाण्याच्या टोकापर्यंत गेली म्हणजे विराम पावते. पण कडेला पोंचलेली लाट पुन्हा त्या कडेच्या धक्क्यानें उठते ती परत येत असेल ! तरीहि हें चक्र केव्हां तरी थांबून पाणी पूर्णपणें स्थिर होत असेल, तसें जगांतील व्यवहाराचें होऊं शकेल काय ? मला वाटतें,

नाहीं. आणि तसें असेल तर जगांतील व्यवहाराचा कार्यकारणभाव अबाधित अखंड चालत राहतो असेंच म्हणावें लागेल.

पण प्रत्येक गोष्टीचा अनादि-अनंत असा कार्यकारणभाव मनुष्याला कसा कळणार ? प्रकाशकिरण, ध्वनि हे जसे मनुष्याला कांहीं मर्यादेपलीकडचे किंवा अलीकडचे दिसूं ऐकूं येत नाहींत, त्याप्रमाणें कार्यकारणाच्या अखंड साखळीचेहि कांहीं थोडेसेच दुवे त्याला दिसतात; आणि तेवढ्यावर तो आपलें काम भागवितो. आणि असें करितांना त्याचा भर क्षुल्लक नैमित्तिक कारणांवर अधिक पडतो.

गाण्यांत कोणत्याहि लयबद्ध तालाचा ठेका सारखा वाजत राहत असतां, गवई हा आपल्या सोईप्रमाणें मध्येंच चीज किंवा तिचा तुकडा सुरू करून आवर्तनाच्या समेवर येऊन विराम पावला म्हणजे त्याचें कार्य होतें, त्याप्रमाणें कार्यकारण परामर्शांतहि मनुष्य करीत असतो.

विलायतेंत, उंच इमारतींच्या माडीवर मजल्यांवर चढून जाण्याच्या लाकडी जिन्याचा एक अपूर्व प्रकार मीं पाहिला आहे. त्याला 'एस्केलेटर'– म्हणजे आवर्तनें करीत फिरत राहणारा जिना—म्हणतात. या जिन्याचें काम येवढेंच कीं, त्यानें चक्राकार सतत आवर्तनें करीत राहावयाचें. त्यावर चढूं इच्छिणारा मनुष्य प्रथम एका स्थिर जागेवर उभा असतो. आणि चढण्याची इच्छा होतांच, त्याच्या पायाशीं येणाऱ्या पायरीवर एक पाय ठेवून व दुसरा उचलून घेऊन चढतो. आणि इष्ट अशा स्थळाशीं येतांच तो पाय उचलून जवळच्या स्थिर जागेवर उतरतो. त्यानें त्याच्यापुरतें कार्य संपतें. मग जिना कितीहि आवर्तनें करीत फिरत राहीना ! याचप्रमाणें मनुष्य हा आपल्या कार्यकारणभाव-परामर्शाचें काम भागवितो.

कागदाच्या गिरणींतहि असेंच कांहींसें घडतें तें असें:— रांध्याचा कागद बनत बनत तो अखंड वस्त्राप्रमाणें रुळांवरून पुढें पुढें सरकत असतो. त्यावर देखरेख करणाऱ्या कामकऱ्याला मध्येंच असा विचार सुचतो कीं, कागदाचें वजन किंवा विणकर हवी तशीच बनत आहे

कीं नाहीं? आणि हा विचार येतांच तो हातानें त्या कागदी वस्त्राचा एक तुकडा फाडून घेतो व ठराविक वजनामापानें त्याचें परीक्षण करितो. बाकीचा कागद आपला प्रवास पुरा करितो.

वरील तीन उदाहरणांत, तालांतील कोणत्या ठेक्यावर गाण्याच्या चिजेच्या तुकड्याला प्रारंभ करावा, फिरत्या जिन्याच्या कोणत्या पायरीवर पाय ठेवून चढूं लागावें, आणि कागदी वस्त्राचा कोणता तुकडा फाडून घ्यावा हें सर्व ठरतें तें यदृच्छेनेंच नव्हे काय? आधीं कां नाहीं किंवा मग कां नाहीं, याचा निर्णय कोण देणार? म्हणजे कार्य-कारणभावाचा परामर्श हा यदृच्छानियत आणि मर्यादितच नव्हे का?

यदृच्छेनें लक्षांत भरणारी 'एखादी' गोष्ट कारणभावानें स्वीकारून तिच्यानंतर घडणारी 'एखादी' गोष्ट कार्यभावानें स्वीकारली म्हणजे मोठीं मौजेचीं अनुमानें निघूं शकतात केव्हां केव्हां.

लहान मुलांचें उष्टावण जुन्या हिंदु पद्धतीनें करितांना अशी चाल असे कीं, सारख्या दिसणाऱ्या रुप्याच्या वाट्या, आंत निरनिराळ्या रंगांचे व गुणांचे पदार्थ घालून ठेवावयाच्या, आणि मूल कोणत्या वाटीला हात लावतें व त्यांतला पदार्थ तोंडांत घालतें हें सकौतुक पाहून त्या-वरून त्याची अभिरुचि व भावी गुण ठरवावयाचे. आतां यांत यदृच्छे-शिवाय निर्णयाला दुसरें कारण कोणतें असणार? आणि अशा रीतीनें केलेलीं भाकितें अनुमानें पुढें चुकीचीं ठरलीं तर त्यांत काय नवल?

विवाहाकरितां वधू पसंत करण्याचीहि जुनी एक वैदिक चाल गमतीची आहे! निरनिराळ्या ठिकाणची माती आणून तिचे गोळे करावयाचे. वधूला वाटेल त्या गोळ्याला हात लाव म्हणून सांगाव-याचें. आणि त्या गोळ्यांतील मातीच्या प्रकारावरून तिचें शील व भवितव्य ठरवून तिला पसंत किंवा नापसंत करावयाची. उदाहरणार्थ, फळ-बागेंतल्या मातीला तिनें हात लावला तर तिला संतति पुष्कळ होईल. गोठ्यांतल्या मातीला हात लावला तर तिच्या नशिबीं उत्तम पशुपालन आहे. यज्ञकुंडांतल्या मातीला हात लावला तर ती धार्मिक वृत्तीची होईल. चवाठ्यावरच्या मातीला हात लावील

तर चौचाल स्वैराचारिणी निघेल. माळ-जमिनीच्या मातीला हात लावील तर वांझोटी निघेल. द्यूतभूमींतल्या मातीला हात लावील तर फटिंग भणंग भिकारीपणांत तिचा जन्म जाईल. आणि स्मशान-भूमींतल्या मातीला हात लावील तर बोलायलाच नको! भर्तृघातकी निघेल! अशीं अनुमानें काढिलीं जात. बिचाऱ्या कार्यकारणभावाची ही सत्त्वपरीक्षाच नव्हे काय?

कुंभाराघरच्या गाढवा, तूंहि बेट्या धन्य आहेस. कारण परसांतल्या आव्यांत भाजणाऱ्या मडक्यांची माती कुंभारपत्नी आपल्या डोक्या-वरून आणीत आहे असें दिसत असतां, तूं बाजूला उभा म्हणून तुलाहि एक प्रकारच्या कारणांत ढकलण्यांत येतें! याला 'अन्यथासिद्ध' कारण म्हणतात.

अहंमदशहा अबदालीला यमुना नदी अवचित उतरण्याला वाट मिळाली म्हणून पानपतला मराठ्यांचा पराभव झाला. रामशास्त्री प्रभुणे हा प्रारंभीं शागीर्द असतां तो यजमानाच्या पायावर पाणी घालीत होता, त्या वेळीं त्याचें लक्ष दुसरीकडे गेल्यामुळें पाणी पायावर नीट पडेना म्हणून तो यजमान रामाला रागानें बोलला. यामुळें पुढें रामाचा रामशास्त्री व नंतर पेशवाईंतील सरन्यायाधीश झाला!

अशाच एका विषयावर लिहितांना एका इंग्रज लेखकानें दिलेलीं दोनतीन उदाहरणें सांगतों. इंग्लंडच्या एका मुख्य प्रधानानें (आस्-क्विथनें) असें म्हटलें आहे कीं, मार्शल नांवाचा जर्मन मुत्सद्दी जर्मन वकील म्हणून इंग्लंडला १९१२ त पाठविला गेला. तो मेला नसता तर १९१४ चें महायुद्ध झालें नसतें. पण हा कार्यकारणभाव कोणी फारसा मानीत नाहीं. इंग्रज फील्ड मार्शल सर वि. रॉबर्टसन याची एक गोष्ट अशी सांगतात कीं, प्रथम शिपाई म्हणून लष्करांत शिरल्या-वर त्याला पळून जाण्याची बुद्धि एक दिवस झाली, व अंगावरचे लष्करी कपडे फेकून देऊन साधे कपडे घालून बराकींतून निसटून जाण्याचाहि विचार त्यानें ठरविला होता. परंतु इतक्यांत त्याचे खाजगी पोषाखाचे कपडे दुसऱ्याच एका शिपायानें चोरले व ते घालून

तो फरारी झाला. यामुळें रॉबर्टसनचा तो बेत फसला! तसें घडलें नसतें तर तो लष्करच्या नोकरींत न राहता व फील्ड मार्शलच्या पदाला न पोंचता!

आणखी एक उदाहरण. अमेरिकेनें अठराव्या शतकांत इंग्लंडशीं युद्ध मांडून पुढें स्वातंत्र्य मिळविलें, त्याला केवळ इंग्लंडांतील एपसम गांवीं एक दिवस पडलेली एक पावसाची सर, असा कार्यकारणभाव म्हणून कांहीं म्हणतात. कसें तें पाहा!

एपसम येथें एक दिवस इंग्रज राजपुत्र दुसरा जॉर्ज मुक्कामाला असतां पाऊस आला. पावसांत घरीं बसून करण्याची करमणूक म्हणून राजकुमारानें पत्त्यांचा डाव काढला. तो खेळायला सोबती पाहिजे म्हणून त्यानें अर्ल ऑफ ब्यूट नांवाच्या उमरावाला घेतलें. या खेळाच्या वेळांत ब्यूटनें आपल्या हुशारीनें राजकुमाराचें आणि सौंदर्यानें राजपुत्राच्या बायकोचें लक्ष वेधून घेतलें. या स्त्रीनें आपला मुलगा जो भावी राजा तिसरा जॉर्ज याची व ब्यूटची दोस्ती करवून दिली. ब्यूट हा अमेरिकन वसाहतवाल्यांचा द्वेष करणारांत अग्रगण्य होता. जॉर्ज राजपुत्र पुढें तिसरा जॉर्ज या नांवानें इंग्लंडचा राजा झाला, व त्याच्या दुराग्रहामुळें अमेरिकन लोक वर्दळीवर आले. त्यामुळें युद्ध झालें व या युद्धांत अमेरिकेनें स्वातंत्र्य मिळविलें. तेव्हां आतां बोला–एपसम येथें पावसाची जी सर पडली ती अमेरिकेच्या स्वातंत्र्याचें कारण होय कीं नाहीं?

असेंच आणखी एक उदाहरण. झाडावरून फळ पडतांना दिसलें म्हणून न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचा सिद्धान्त हुडकून काढला. प्रसिद्ध धर्मसुधारक लायोला हा युद्धांत जखमी झाल्यामुळें त्यानें लष्करी नोकरी सोडली, व धर्मोपदेशकाचें काम स्वीकारून ल्यूथरच्या सहकारितेनें धर्मक्रांति केली.

अमेरिकन प्रेसिडेंट लिंकन याचा खून झाला तो केवळ त्याच्या शरीररक्षक रखवालदाराचें लक्ष क्षणभर त्याजवरून ढळल्यानें!

वरीलपैकीं कांहीं कांहीं प्रसंगांतली यदृच्छेची कामगिरी चिंतनीय वाटेल यांत शंका नाहीं. परंतु कार्यकारणवादी लोक, ज्योतिषी लोकाप्रमाणें, कार्यकारणभावाची अतिशयोक्ति करितात ती फार मौजेची वाटते. उदाहरणार्थ, कांहीं लोकांनीं असेंहि म्हटलें आहे कीं, मिसर देशची विलासिनी राणी जी क्लिओपात्रा, तिचें नाक किंचित् अधिक लांब किंवा किंचित् अधिक आखूड असतें तर रोमन वीर सीझर व अँटनी हें तिच्या सौंदर्यावर मोहित झाले नसते, व जगाचा इतिहास कांहीं वेगळाच झाला असता. एकूण शाबास त्या जादुगार नासिकेची! जणूं कांहीं क्लिओपात्रेच्या नाकाची जी लांबी ( इंच व त्याचे अंश ) होती तीच तिच्या सर्व सौंदर्यांतील मुख्य गोष्ट होती ! पण समजा, इतक्या बरोबर लांबीचें नाक एखाद्या कुरूप काळयाकुट्ट हबशिणीच्या तोंडावर असतें तर सीझर, अँटनी हे तिच्यावर फिदा झाले असते काय ? शिवाय जगाचा इतिहासहि, सीझर-अँटनी यांच्याच पराक्रमामुळें झाला म्हणतात, तसा खरोखरच तो घडला कीं काय ? हाहि प्रश्न म्हणून उपस्थित होऊं शकतो. परंतु क्लिओपात्रेच्या नाकाच्या लांबीमुळें हा जगाचा इतिहास असा घडला असें म्हणणें हा मात्र प्रातिभेचा अचाट पराक्रम खरा !

क्लिओपात्रेच्या नाकाचें समजलें. पण, मंगळवेढ्याच्या कान्होपात्रेचें नाक किती लांब होतें हें कोणी सांगेल का, कीं ज्याच्यामुळें तिच्या सौंदर्याची कीर्ति विजापूरच्या बादशहाच्या कानांवर गेली व त्या कीर्तीमुळें त्यानें तिला धरून आणण्याला शिपाई पाठविले ?

पण नाकच काय, इतर कोणत्याहि मुखेंद्रियाविषयीं तेंच म्हणतां येईल. आमचा संस्कृत साहित्याचार्य आनंदवर्धन काय म्हणतो पाहा—

( प्रतीयमानं पुनरन्यदेव
वस्वस्ति वाणीषु महाकवीनाम् )
यत् तत् प्रसिध्धावयवातिरिक्तम
विभाति लावण्यमिवांगनासु

स्त्री-लावण्य हें कोणत्याहि अवयवावर अवलंबून नसतें. तर 'अवयवातिरिक्त', अवयवाहून वेगळें असतें.

पाण्यांत बुडणारा मनुष्य सापडेल त्या काडीला धरतो चिकटतो म्हणतात! हें बुडणाऱ्या माणसाच्या आशावादी मनाचें यथार्थ वर्णन झालें खरें. पण खरोखर ती काडीच असेल तर ती त्याला वांचवूं शकेल काय याचा विचार कोणी करीत नाहीं.

पण काडीसारखी बारीक दोरी प्रथम हाताला लागल्यानें ती घेऊन तिच्या साहाय्यानें खलाशी न बुडतां किनाऱ्याला लागले, किंवा किल्ल्यांतले बंदिवान तट उतरून पळून जाऊं शकले, किंवा प्रियतमेच्या खिडकीकडे पाहत राहणारे प्रियकर शेवटीं वर चढून खिडकींतून शय्यागारांत प्रविष्ट झाले, याविषयीं अद्भुतरम्य कथा, घडलेल्या गोष्टी म्हणून, ग्रंथांतरीं वाचावयाला सापडतात. पण त्यांचा खरा प्रकार मुळांत किती अखंड सूत्रबद्ध असतो पाहा! एकच उदाहरण. सर्व नकोत.

समुद्राच्या किनाऱ्याअलीकडे कांहीं अंतरावर बुडणारें गलबत येतें. पण तें प्रत्यक्ष किनाऱ्याला लागूं शकत नाहीं. तें वांचविण्याकरितां किनाऱ्यावर लोक जमलेले असतात. पण किनाऱ्यावरील होडींतून बुडत्या गलबताकडे जातां येत नाहीं. तेव्हां मग असा उपाय करतात: गलबतांतले लोक एका बाणाला एक बारीकशी दोरी बांधतात. पण ती जहाजापासून किनाऱ्यापर्यंत पोंचण्याइतकी लांब असते. तो बाण धनुष्यासारख्या यंत्रावरून किनाऱ्याकडे फेकतात. तो पोंचल्यावर किनाऱ्यावरचीं माणसें ती दोरी बळकट धरून ठेवतात व उंच काठीवर उभारतात. या दोरीचें दुसऱ्या बाजूचें, म्हणजे जहाजावरील, टोक फिरून त्याहून जाड अशा लांब दोरीला बांधलेलें असतें. तिचें टोक त्या दोरीहून जाड अशा दोराला, त्या दोराचें टोक त्याहून जाड मोठ्या दोरखंडाला, बांधलेलें असतें. अशा रीतीनें अखंड जोडलेली दोरी–दोर–दोरखंड जहाजावरील लोक सोडीत असतात, व किनाऱ्यावरील लोक ओढीत असतात. अर्थात्

या ओढण्यानें जहाजाला गति मिळून तें किनाऱ्याकडे खेचलें जातें, व उथळ पाण्यांत गेल्यावर आंतील लोक उड्या टाकून किनाऱ्यावर जातात! हीच युक्ति किल्ल्यांतून पळून जाणारा कैदी, व प्रियकरणीच्या महालांत चढून जाणारा प्रियकर, यांच्या बाबतींत योजण्यांत येते.

मग आतां बोला, यांत प्रथम हातीं पोंचणाऱ्या बारीक दोरीला महत्त्व, कीं ज्या दोरखंडामुळें जहाज खेचलें गेलें त्याला महत्त्व? दोरी हातीं लागली, पण दोरखंड पुरें पडलें नाहीं तर? उलट जहाजावर दोरखंड भरपूर होतें, पण दोरी किनाऱ्यावरील लोकांच्या हातीं पोंचलीच नाहीं तर? तात्पर्य, नुसती दोरी किंवा नुसतें दोरखंड यांनीं काम भागत नाहीं. दोरीच्या बळावर जहाज खेचलें जात नाहीं! दोरखंड बाणाच्या टोकाला लावून किनाऱ्यावर फेकतां येत नाहीं!

एकूण काय? दोरी दोरखंड यांपैकीं कोणाहि एकट्याला निर्णायक कारण ठरवून कार्यकारणभावाचा निकाल लागत नाहीं. दोहोंना अंशकारण मानावें लागतें. कार्यकारणभाव हा सामुदायिक मानावा लागतो. एकट्या पहिलवानानें कुस्ती जिंकली तरी त्याच्या सगळ्या आखाड्याची पुण्याई, शिकवण, बळ, उत्साह, स्फूर्ति त्याच्यामागें असते. पण मनुष्य हा अद्भुताचा प्रेमी भुकेला असल्यामुळें त्याला शक्य दिसणारें शक्य झालें, न घडावें तें घडलें, हें मनानें मानावयाला आवडतें त्याला काय करणार?

'तदेकं वद निश्चित्य' असा टोमणा अर्जुनानें श्रीकृष्णाला दिला. पण शेवटीं जी सगळी गीता त्यानें, भाविक विधवा पुराण ऐकते त्याप्रमाणें, ऐकून घेतली त्यांत किती निरनिराळे मोक्षमार्ग सांगितले?

यत्नवाद व दैववाद यासंबंधींहि असेंच. दोन्ही आपापल्यापुरते खरे. पण कार्यसिद्धि ही यत्न व दैव यांच्या जोडीनेंच होते ना? यत्न करूनहि दैवाविणें तो फुकट जातो हें खरें, तसेंच दैव अनुकूल असलें तरी मुळींच यत्न न करणाराच्या पदरीं फळ पडेल काय? 'असेल माझा हरि तर देईल खाटल्यावरी!' पण बेट्या, तूं खाटल्यावर पालथाच

पडलास, किंवा तोंडाशीं घास आल्यावर ओठ उघडले नाहींस, तर तो घास उदरांत कसा जाणार ? एक वेळ भरविण्याकरितां दुसरा कोणी तुझे ओठ उघडील; पण गिळण्याची क्रिया तरी तुझी तुलाच केली पाहिजे, नव्हे का ? हरि खाटल्यावर आणून देईल, पण गिळण्याच्या कामाचाहि मक्ता—पत्कर त्यानें घेतला असें वरील वचनांत सांगितलेलें नाहीं.

भारतकारानें 'दैवमेवात्र पंचमं' (कारणं) हें उत्तर अतिशयोक्त यत्न-वाद्याला दिलें आहे. आणि रामदासांनीं 'यत्न तो देव जाणावा' व 'केल्यावीण होत नाहीं' या वचनांनीं अतिशयोक्त दैववाद्याला उत्तर दिलें आहे.

'Chance is a nickname for Providence'. 'There is no such thing as chance. And what seems to us a merest accident springs from the deepest source of destiny.'

वरील वचनांत आकस्मिक संभवाला प्रतिईश्वर म्हटलें आहे. पण ईश्वराचें नांव घेतलें कीं कार्यकारणपरंपरा सर्व सृष्टीचे आदिकारणापर्यंत जाते. म्हणजे त्यानंतरची सर्व कार्यकारणपरंपरा अखंड ध्यावी लागते. जॉर्ज ईलियट ही तत्त्वज्ञानी ग्रंथकर्त्री म्हणते— 'Favourable chance is the God of all men who follow their own devices.' याचा अर्थच हा कीं, मनुष्य आपली बुद्धि चालवून घटना बनवीत असतो, व एखाद्या विशेष अनुकूल गोष्टीनें त्याचें कार्य सिद्ध झालेंसें दिसतें इतकेंच. हा सामुदायिक कार्यकारण-भावच होय. दैव व यत्न यांचा समन्वय होय.

पाणी थंड होत होत जातें, पण अगदीं गोठून बर्फाचें स्वरूप येईपर्यंत तें पाणीच असतें. शेवटीं एका विवक्षित अंशावर एकदम बर्फ होतें. पण तेथपर्यंत अंशाअंशानें वाढत जाणारी थंडी हें त्याचें कारण नव्हे काय ?

तात्पर्य, माझा तत्त्वज्ञानी मित्र सूत्ररूपानें म्हणतो तेंच खरें. 'आदिला अंत नाहीं आणि अंताला आदि नाहीं !'

# आंतला आवाज ३

'ध्वनि' व 'व्यंजना' या दोन शब्दांना संस्कृत साहित्यशास्त्रांत फार महत्त्व आलेलें आहे. तो माझा प्रस्तुत विषय नाहीं. येथें इतकेंच सांगतों कीं या दोन्ही शब्दांचा साधासुधा अर्थ 'सुचविलेला तात्पर्यार्थ' इतकाच मी येथें घेतों. सुचविलेला असें कां म्हणावयाचें तर तो प्रत्यक्ष सरळ शब्दांतून निघत नाहीं म्हणून. मग तो दडविलेला अर्थ कोणाच्या मनांतला ? एक तर तो स्वतः बोलणाराच्या मनांतला. मात्र तो एकच असतो. पण वाचक हा मार्मिक सहृदय रसिक असेल तर कवीच्या मनांत नसलेला असाहि अर्थ तो त्यांतून काढूं शकतो. कवि मोरोपंतांच्या कांहीं आर्यांतून असे निरनिराळे अर्थ काढलेले पढिक मराठी वाचकांना माहीत आहेतच. मूळ कवीवर हा जुलूमच असतो म्हणावयाचा ! शिवाय हे अर्थ बहुधा अतिशयोक्ति-रंजित, फाजील तरळ बुद्धीचे, व असंबद्ध असतात हें निराळेंच.

पण कित्येक वेळां स्वतः कवीच्या अर्थाहून अधिक सरस असा एखादा अर्थ एखादा वाचक प्रतिभेनें काढूं शकतो. कवि ब्राउनिंग याच्या एका ओळीचा असाच अर्थ एका मित्रानें लावून दाखविला तेव्हां तो आनंदानें हसून म्हणाला, "अरे होय कीं ! I did not mean it then. But I mean it now" !

एका मराठी शाळेंत हा श्लोक घड्यांत निघाला—

'स्तुती करावी परमेश्वराची। करूं नये व्यर्थ कधीं नराची.' याचा अर्थ सरळ आहे. आणि 'स्तुतीस कीं ईश्वर पात्र होतो। तसा तिला मानव काय हो तो?' असें मूळ कवीनें त्याचें समर्थनहि केलें आहे.

पण एक विद्यार्थी बुद्धिमान् पण 'लुच्च्या' होता. तो म्हणाला, "सर सर, तसें नव्हे. व्यर्थ हा शब्द 'फुकटाफुकटी' अशा अर्थानें योजला आहे असें मला वाटतें. माणसाची स्तुति व्यर्थ म्हणजे फुकट करूं नये. पण आपला कांहीं लाग त्या माणसाकडून साधून घ्यायचा असेल किंवा घेतां येईल तर मात्र मनुष्याची स्तुति करणें योग्य होईल. स्तुति 'व्यर्थ' न करावी.

मास्तर म्हणाले, 'अरे गुलामा! तूं तर कवीवर मात केलीस कीं! पण मुलांनो, लक्षांत ठेवा कीं, जगांतला पुष्कळसा व्यवहार या रसिक मार्मिक विद्यार्थ्याच्याच बाजूचा आहे बरें का!'

कुणाला आपलें एखादें काम कोणा दुसऱ्याकडून करून घ्यावयाचें असलें तर त्याला नुसतें तोंडच्या शब्दांनीं खूष केल्यानें तें एखादवेळ होऊं शकतें. कारण आपल्या स्तुतीला बळी न पडेल असा 'परमहंस' जगांत बहुधा विरळाच! नाजुक आत्मस्तुतीनें वश झालेला मनुष्य मनानें थोडा अधिक उदार व हातानें थोडा अधिक सढळ होतो.

याचा प्रयोग परवां स्वतः माझ्यावर झाला तोच सांगतो. एका शाळेंतील मुलें त्यांचें 'हस्तलिखित' मासिक पुस्तक घेऊन मजकडे आलीं. आणि स्वाक्षरींतील अभिप्राय व संदेश मागूं लागली. या अभिप्रायांना व संदेशांना मी आतां इतका कंटाळून गेलों आहे कीं एखाद वेळ मला त्या जुलमाचा रागहि येतो. पण थोड्या वेळानें कांहीं तरी लिहून देतोंच! वाटतें कीं मुलांचा उत्साह! त्याला विरजण घालूं नये. परवां मीं अशा दोन ओळी लिहिल्यावर त्यांतला एक 'गुलाम' मुलगा हसून म्हणाला 'सर, तुमचें बाळबोध अक्षर किती छान आहे'! मला सुंदर अक्षराची आवड फार आहे हें त्याला कदाचित् माहीत असावें. आणि माझें हस्ताक्षर बऱ्यापैकीं आहे असें

मलाहि वाटतें. या नाजुक स्तुतीचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. कारण अभिप्रायाच्या दोन ओळी फार थोड्या होतात, म्हणून मीं आणखी कांहीं लिहावें असें त्या मुलांना वाटत असावें. तेव्हां मींहि आपलें मन थोडें अधिक उदार व हात थोडा अधिक सढळ करून अभिप्राय वाढवून लिहिला आणि तीं मुलें हसत (मलाच हसत कीं काय कुणाला ठाऊक म्हणा) खूप होऊन निघून गेलीं. 'तुमचं अक्षर चागलं आहे' याचा ध्वन्यर्थ 'आणखी थोडें लिहा'!

थोडें स्तुतिपर गोड बोलून कार्य साधल्याचीं अशींच आणखी उदाहरणें देतां येतील. एक असें:—

मोटार गाडी पेट्रोल पंपावर पेट्रोल भरायला आली. मालकानें चार गॅलन पेट्रोल भरायला सांगितलें. पंपवाल्याच्या मनांत त्यांनीं आणखी तेल घ्यावें असें होतें. पण तसें सरळ न म्हणतां, इकडे तेल भरणें सुरू असतां, तो गाडीच्या कडेवर हात टेकून म्हणाला, 'साहेब, फार चांगल्या मेकरची गाडी आपल्याला मिळाली आहे. इच्या टाकींत किती पेट्रोल मावतें?' मालक चढले, म्हणाले 'सहज दहा अकरा गॅलन. एकदां भरून घेतली कीं दोन अडीचशें मैलपर्यंत मी मजेंत जातों. वरचेवर थांबून पेट्रोल कुणी घेत बसावें? म्हणून माझें पाहणें असें असतें कीं टाकी नेहमीं भरलेली असावी'. पंपवाला म्हणाला, 'साहेब, इतकी दूरदृष्टि ठेवणारे मालक किती असतात? नाहीं तर मध्येंच पेट्रोल संपलें म्हणून शेवटीं पुढच्या पंपापर्यंत गाडी हातानें ढकलीत, किंवा चढ असला तर बैल लावून ओढीत, नेल्याचीं उदाहरणें मीं पाहिलीं आहेत.' इतकें बोलून तो मालकाच्या हुकमाची वाट न पाहतांच आपल्या नोकराला म्हणाला 'नबी, पंप बंद करूं नको. घाल आणखी सहा गॅलन. टाकी रिकाम्या पोटानें गेलेली कुणाहि पंपवाल्याला पाहवत नाहीं, साहेब. गाडी पण गाडी आहे.' झालें, मालक चुळबुळ करतां करतां दहा गॅलन पेट्रोल भरलें गेलें. मालकांनीं मुकाट्यानें बिल घेऊन चुकतें केलें आणि पंपवाल्यानें लवून मुजरा केला! 'गाडी पण गाडी आहे,' याचा अर्थ 'आणखी पेट्रोल भरा!'

परवां मंडईत गेलों. भाजी, फळें घेण्याकरितां पाटीवाली बोलावली. भाजीनें निम्मी पाटी भरली. माळीण लबाड होती. ती म्हणाली, 'साहेब अन् आतां अशी निम्मी पाटीच नेणार! पैसे द्यायला लोक फार तर रुपया पुढें करून मोड मागतात. आपण तर पांच रुपयांची नोटच काढली कीं! या भाजीच्या डोईवर केळयांचा घड कसा शोभून दिसल बघा तरी! अगदीं शेषाच्या फडीवाणी! कुठं मोजीत बसूं एक न् दोन'. असें म्हणून पंचवीसतीस केळयांचा घड तिनें एकदम पाटींत ठेवूनच दिला, आणि आपल्या कापडी पिशवींत हात घालून पांच रुपयांतले उरलेले पैसे तिनें माझ्या हातावर ठेवले. तिचा हिशोब माझ्या आधीं तयार झाला आणि तोहि बरोबर! माझी खाली आहे कीं एखादी लबाड माळीण तुमच्या बी. कॉम्. एम्. कॉम्.ला मंडईच्या व्यवहारांत पुरून उरेल. मी माझ्या दिलदार-पणाच्या व श्रीमंतीच्या नाजुक स्तुतीला भुललों, आणि केळीं परत न करितां पाटीवालीला घेऊन चालूं लागलों. 'आपण तर पांच रुपयांची नोटच काढली कीं' याचा अर्थ, 'केळींहि घ्या.'

आमचे एक श्रीमान् स्नेही मोतीं खरेदी करायला सराफ बाजारांत गेले. त्यांना बायकोकरितां एक कुड्यांचा जोड विकत घ्यायचा होता. तो सौदा चांगला झाला असें त्याला वाटतें. पण मोतीवाला त्याला असा सुखासुखी थोडाच सोडणार! त्यानें नथीच्या मोत्याची एक मोठी पाणीदार जोडी अलवानांतून काढली। आणि स्वतःच वर्णन करून म्हणाला, 'साहेब, कान खूष झाले पण नाक नाराज होईल ना! बाईसाहेबांची नथ परवां माझ्याकडं सोडवून बांधायला आली तेव्हांच मीं पाहिलं होतं कीं जोडी सुमार आहे. ती बदलायला सांगावं. साहेब, आधीं नाकाकडं नजर जाते मग कानाकडं! हवं तर हा कुड्याचा जोड मी परत घेतों. पण आपण प्रथम नथीची जोडी घेऊन जा!' हें ऐकून माझ्या स्नेह्याच्या श्रीमंतीला अहंकाराची मुंगी डसली. तो म्हणाला, 'छेः छेः, कुड्या घेतल्या त्या काय परत देण्याकरितां कीं काय?' मोतीवाला म्हणाला, 'साहेब, माझीच

चूक झाली खरी. आम्ही मौल्यवान् मोत्यांचे व्यापारी असलों तरी घरचे श्रीमंत थोडेच असतों! आपल्यासारखे आपण. कुड्या तर ठेवालच पण हा नथीचा जोडहि घेऊन जाल. आणखीहि एखादा जिन्नस घेऊन जाल. हौस आणि श्रीमंती एकत्र नांदण्याला भाग्य लागतं. जा घेऊन ही जोडी. मी किंमत देखील सांगत बसत नाहीं. ही जोडी घालून नथ बांधवून देतों, ती घरीं घेऊन आपण गेल्या-बरोबर आपणाला ओवाळायला बाईसाहेब पंचारती घेऊन न आल्या तर मी आपलं नांव बदलीन. उगीच नाहीं इतकीं वर्षे मोत्याचा व्यापार केला!' माझा मित्र इतका खूष झाला त्या श्रीमंतीच्या व स्त्री-प्रेमाच्या स्तुतीनें, कीं तो त्या कुड्याबरोबर ती जोडीहि खरीद करून गेला. 'हौस आणि श्रीमंती एकत्र नांदायला भाग्य लागतं' याचा अर्थ 'नथीचीं मोतीं खरेदी करा' !

मी मोटारींत बसलों आणि मला गाडी वेगानें काढायला हवी असली म्हणजे ड्रायव्हरला प्रत्यक्ष तसें सांगत नाहीं. त्याला ओझरतें ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें, पण आपापसांत बोलल्याप्रमाणें, मी शेजारच्या स्नेह्याला म्हणतों, "त्या मोटार-शर्यतींच्या गोष्टी कशाला सांगतां? तें शर्यती करण्याचं वाळूचं मैदान पुण्यास नाहीं इतकंच काय तें. मोटारहि त्याकरितां मुद्दाम बांधायला नको. हीच मोटार हा आमचा ड्रायव्हर शर्यतीच्या वेगानें हाकूं शकेल. मला वेळेवर मुक्काम गाठायची आजवर कधींच पंचाईत पडली नाहीं." माझें बोलणें संपतांच तो मोटार इतक्या वेगानें हाणूं लागतो व आपलें कौशल्य दाखविण्याची ऐट करतो कीं, लवकरच मला म्हणावें लागतें, 'रामा, अरे, पुण्यास अशी मोटार चालवून खटला करून घ्यायचा कीं काय?'

गवयीबुवा तीन तास गाऊन थकले असले पण गाणें आणखी चालू राहावें असें वाटलें तर 'आतां मात्र बुवांचा गळा लागला आहे, पाहून घ्या. आणि मध्यरात्रीनंतर गाण्याच्या रागांना तर येथून प्रारंभ व्हायचा. सकाळीं चहा पिऊन मगच घरीं जा कसे.' हें ऐकलें

म्हणजे बुवांनीं गाण्याचा नवा हप्ता सुरू करायला तयारी म्हणून पान-सुपारीचें तबक पुढें ओढलेंच समजा.

सैपाकाची तारीफ केली म्हणजे मग तुम्ही न मागतां नको-पुरें म्हणेपर्यंत खाण्याचा आग्रह झालाच म्हणून समजावें. किंवा म्हणावें 'या घरीं अन्नपूर्णेचा वास आहे हें काय आम्हांला माहीत नाहीं ?' आपल्या स्वयंपाकाची स्तुति होणारच या आत्मविश्वासानें घरधनीण, तिनें स्वतः स्वयंपाक केलेला असल्यास, पंक्तींत येऊन सर्वत्र न्याहाळूं लागते. कित्येक ओळखीचे आचारीदेखील, आपण आखूड पंचा नेसलों आहों हें विसरून जाऊन, स्तुति ऐकण्याच्या इच्छेनें पंगतींत येतात, आणि पाठीकडे हात जोडून विजयानंदी दृष्टीनें पाहत राहतात. आणि ओळखीचा पाहुणा नुसता त्यांच्याकडे पाहून कोणी हसला कीं, यांनीं आपल्या हाताखालच्या वाढप्याला फर्माविलेंच समजा, कीं दोन जिलब्या नाहीं तर चार भजीं आणून यांच्या पानांत हळूच वाढ.

कारकुनांना संध्याकाळच्यानंतर कचेरींत राबवावयाचें झालें तर अधिकारी 'आपल्या कचेरींतले लोक इतर कचेऱ्यांपेक्षां अधिक इमानी आहेत' असें म्हणतांना त्यांच्या कानावर जाण्याची व्यवस्था करतात. म्हणजे हवें तेवढें काम घ्या. कारकून रात्रीं घरीं जातांना कागदपत्रांचीं फाइलें खाकेंत मारून घरीं जातात, आणि रात्रीं जाग्रणहि करितात असें प्रत्ययाला येतें.

आणखीहि अशींच उदाहरणें देतां येतील. पण पुष्कळ वाचकांना याचा अनुभव असतो म्हणून तीं वाढवीत नाहीं. वर दिलेल्या या उदाहरणांत काय घडलें आहे तें पहा. म्हणजे असें—आणखी अभिप्राय वाढवून लिहा, असें त्या विद्यार्थ्यांनीं मला सरळ सांगितलें नाहीं. माझीं केळीं घ्या, असें ती माळीण उघड म्हणाली नाहीं. माझें पेट्रोल अधिक घ्या, असें तो पंपवाला म्हणाला नाहीं. मोत्यांची नथेची जोडी खरेदी करा, असें तो व्यापारी नीरस हावऱ्या व्यापारी पद्धतीनें म्हणाला नाहीं. गाडी वेगानें चालीव। असें त्या ड्रायव्हराला मीं

सांगितलें नाहीं. आणखी गा, असें त्या गवयाला प्रत्यक्ष सांगितलें नाहीं. आणखी वाढा, असें त्या आचाऱ्याला कोणी बोललें नाहीं. आणि इतक्यांत काम संपवून कचेरींतून उठावयाचें नाहीं, अशी आज्ञा अधिकाऱ्यानें अरेरावीपणानें केली नाहीं. पण पर्यायानें बोलल्यानें हवें होतें तेंच सर्वत्र पदरांत पडलें.

प्रारंभीं काव्यांतील व्यंग्य किंवा ध्वनि यासंबंधानें दिग्दर्शन केलें. तेंच आतां पुन्हा थोडें सांगतों. या सूचित अर्थाचें ठराविक उदाहरण साहित्यशास्त्रकारांचें 'गतोस्तं अर्कः' असें आहे. याचा सरळ वाच्यार्थ 'सूर्याचा अस्त झाला'. शब्द तेच. पण ध्वनि किती निरनिराळे पहा! गृहिणीनें हे शब्द उच्चारलेले ऐकून गृहस्थाश्रमी पुरुष संध्येकरितां हातपाय धुवायला निघतो. दासीनें हे शब्द उच्चारलेले ऐकून कलावंतीण आपली वेणी-फणी करण्याच्या उद्योगाला लागते. सहकाऱ्यानें हे शब्द उच्चारलेले ऐकून त्या रात्रीं दरोडा घालण्याचा संकेत केलेले चोरटे आपल्या वेषपालटाचीं साधनें व हत्यारें यांची जमवाजमव करूं लागतात. मित्रानें हे शब्द उच्चारलेले ऐकून सहा वाजले असें समजून सव्वासहाच्या सिनेमाला जाण्याच्या तयारीला त्याचा सहचारी मित्र प्रारंभ करितो. आतां वरील 'सूर्यास्त झाला' या शब्दांत तर सूर्य मावळला या विधानाशिवाय दुसरें कांहींच नाहीं. म्हणूनच इतक्या निरनिराळ्या क्रिया घडवून आणणाऱ्या या शब्दांत सरळ वाच्यार्थाबरोबर सूचक म्हणूनहि कांहीं वेगळा, पण स्पष्ट शब्दांनीं तें तें न सांगितलेला, 'सूचित' अर्थ आहे हें सिद्ध झालें नाहीं काय?

असल्याच पर्यायशब्दांनीं स्वार्थी बुद्धीचीं माणसें दुसऱ्याकडून आपलीं कामें जगांत करवून घेत असतात. मात्र ही स्तुति पर्याययुक्त व नाजुक शब्दांनीं केलेली असावी लागते. ती उघड भडक धसमुसळी असतां कामा नये.

गोष्ट अशी सांगतात, कीं प्रख्यात स्त्रीकादंबरीकार मेरी कॉरेली ही जन्मभर अविवाहित होती. एकदां तिला एकानें विचारलें, 'बाई तुम्ही लग्न कां करीत नाहीं?' तेव्हां त्या प्रश्नाचें सरळ उत्तर न देतां

ती म्हणाली, 'माझ्या घरीं आवडता कुत्रा आहे तो सकाळभर येईल जाईल त्याच्या अंगावर भुंकून तोंड टाकतो. आवडता पोपट आहे तो, त्याला थट्टेनें शिकविलेले अभद्र शब्द– शिव्या– वाक्यें दिवसभर पाठ म्हणत असतो. आणि पहाट झाली म्हणजे, आवाज न करितां चोरा-सारखें दार उघडून घरांत येऊन माझ्या खोलींत निजणारें माझें आवडतें मांजर तयार असतेंच.' मेरी कॉरेलीच्या सरळ शब्दार्थांत त्या त्या प्राण्यांच्या वाईट सवयींचेंच वर्णन आहे. पण 'नवऱ्यापुरुषांच्या अंगीं असले दुर्गुण असतात म्हणून नवराच करायला मला आवडत नाहीं' हा जो अर्थ तोच यांतला सूचित अर्थ— व्यंग्यार्थ होय.

दुसरें एक उदाहरण. एक गृहस्थ म्हणतो 'आपण जें अन्न खातों त्याच्या एकतृतीयांशावर आपण जगतों आणि दोनतृतीयांशावर आपला डॉक्टर वैद्य जगतो!' या ठिकाणीं आपण गरजेपेक्षां फार अधिक अन्न खातों असें या गृहस्थाला निषेधपूर्वक सांगावयाचें आहे. पण तो बोलला त्या शब्दांच्या सरळ वाच्यार्थांत तें कुठें आहे? तें त्यानें आडून पर्यायानें ध्वनित केलें नव्हे काय?

आपली निंदा ही सरळ स्पष्ट शब्दांनीं केलेली काय, किंवा समजण्याइतक्या वक्रोक्तीनें, व्यंग्यार्थानें, ध्वनीनें केलेली कुणालाच आवडत नाहीं. तशीच स्पष्ट उघड शब्दांनीं केलेली स्तुतिहि समंजस माणसाला आवडत नाहीं. तें ग्राम्य लक्षण किंवा ती हीन अभिरुचि ठरते. पण सदभिरुचीच्या मनुष्यालाहि पर्यायानें ध्वनीनें केलेली आपली नाजुक स्तुति मानवूं शकते. उघडच आहे. थंडी निवारण्याकरितां ऊन पाण्याची बाटली कुशींत घ्यायची असते. पण ती उघड्या अंगाला लागून घेतली कीं चटका देते म्हणून नकोशी वाटते. पण मध्यें एक दुपदरी तिपदरी चादर घेतली म्हणजे मग तीच अत्यंत सुखदायक वाटते. तशांतलाच प्रकार स्तुतिगर्भ व्यंग्यार्थाचा किंवा ध्वनीचा असतो. मात्र येथें या दोन तांत्रिक शब्दांतील सूक्ष्म भेदांत मी शिरत नाहीं.

स्वार्थी लोकच तेवढे अशा पर्यायशब्दांनीं सूचितार्थानें आपलें काम करून घेतात असें नव्हे, तर परोपकारार्थहि या युक्तीचा अवलंब होऊं शकतो. साहित्यशास्त्रकार मम्मट यानें काव्याचे हेतु सांगतांना 'कांता संमिततयोपदेशयुजे' असें म्हटलें आहे. याचा अर्थ 'स्त्री गोड शब्दांनीं पतीला उपदेश करते, ताळ्यावर आणते, दुर्गुणापासून त्याला परावृत्त करतें, तसलेंच कार्य काव्य करूं शकतें, असा आहे. उघडच आहे कीं, स्त्रिया प्रायः मंजुळ स्वरांनीं बोलणाऱ्या असतात. स्वार्थी पत्नी दागिन्यांचा हट्ट गोड बोलून उगवून घेईल, तर पतिव्रता पतीला गोड शब्दांनींच उपदेश करील. त्यांतूनहि गोड गळा, मृदुस्वर, विनय, यांच्या जोडीला ध्वनियुक्त व्यंग्यार्थानें तिला बोलतां आलें तर तें हितोपदेशाचें काम अधिकच यशस्वी होण्याचा संभव नाहीं काय ?

अन्योक्तीनें बोलणें हें देखील पर्यायानें बोलण्याचाच प्रकार मानितां येईल. योगवासिष्ट, भारत यांमध्यें पुष्कळसा बोध अन्योक्तिवाचक कथांनींच केलेला आहे. आणि हितोपदेश, पंचतंत्र, इसापच्या कथा यांचा तो हेतु तर स्पष्टच आहे. एरवीं पशुपक्षी खरोखर थोडेंच माणसासारखें बोलतात !

आणि शब्दाप्रमाणें नुसत्या कृतींतूनहि ध्वनि उमटवितां येतो कीं ! जुन्या राजे लोकांना तुम्ही भेटायला गेला आणि पानविडा आला, म्हणजे समजावें कीं तुम्हीं आतां उठावयाचें, मुलाखत संपली असाच त्याचा अर्थ असतो. आमच्या क्लबांत परवां बसलों असतां थंडीच्या कडाक्याचें वर्णन निघालें. भाऊसाहेब म्हणाले, 'बिचारी माझी बायको माडीवरच चहा आणून देते. म्हणून अंगावरचें पांघरूण ठेवून बिछान्यांतच नुसतें उठून बसलों कीं झालें. मग कशाला थंडी बाधेल ?' पण त्यावर मी म्हणालों, 'छे, त्यांत व्यंग्य किंवा ध्वनि आहे बरं का हो मंडळी. तो असा. याला चहा प्याल्याबरोबर लगेच सिगारेट ओढायची तलफ येते. चहाचा पेला खालीं ठेवतांच

हा तिथेंच अग्निहोत्र सुरू करतो. सगळें माजघर धुराच्या घाणीनें भरून जातें. त्या बिचारीला ती घाण नको असते. पण हे पडले नवरोबा. 'इथं विडी ओढूं नका' म्हणून ती पतिव्रता याला तसा हुकूम कसा करणार ? म्हणून ती माडीवरची एक खेप पत्करते. दुसरें काय ?'

हा कृतींतला ध्वन्यर्थ बरें का ?

---

# कसं काय आहे ?! ४

कसं काय आहे— या वाक्यापुढें कोणतें चिन्ह घालावयाचें असा, व्याकरणाच्या धड्यांतला म्हणून, प्रश्न विचारला तर शाळकरी विद्यार्थी 'प्रश्नचिन्ह' म्हणून उत्तर देईल. आणि त्याच्या शिक्षणापुरतें अनुभवापुरतें तें उत्तर बरोबर ठरेल. पण हें वाक्य प्रश्नार्थीच असतें असें नाहीं. तें उद्गारार्थीहि असतें. मात्र मनुष्य जसजसा मोठा होत जातो, त्याच्या ओळखी वाढतात, व्यवहारांतला दांभिक शिष्टपणा त्याच्या अंगीं मुरूं लागतो, तसतसे त्याला 'कसं काय आहे' हें वाक्य बिनअर्थानेंहि उच्चारण्याचे प्रसंग अधिकाधिक येऊं लागतात. आणि त्याचें व्याकरण त्यापुरतें बदलूं लागतें.

आपण ओळखीचीं माणसें रस्त्यांत एकमेकांना भेटलों– म्हणजे तोंडासमोर आलों– म्हणजे ती ओळख दाखविल्याशिवाय पुढें जाऊं नये अशी इच्छा सहजच होते. त्याचा साधा प्रकार 'हस्तिदंती' या नांवानें संबोधला जातो. कारण या प्रकारांत हात आणि दांत या दोहोंचाहि किंचित् उपयोग करण्यांत येतो. हात जोडायचे आणि किंचित् हसल्यासारखें करायचें ही हस्तिदंती. पण या शब्दाच्या लाक्षणिक अर्थामध्यें गूढ अशी निंदा येऊन बसली आहे. हस्तिदंत म्हणजे हत्तीचे दांत. आणि हत्तीचे 'दाखवायचे दांत वेगळे व खायचे

दांत वेगळे' ही म्हण प्रसिद्ध आहे. माणसांमधल्या दिखाऊ बहाणेदार कपटी स्वभावाला उद्देशून ती म्हण बनली आहे.

हसणें हें सर्वार्थसाधक असतें. तें सहज किंवा नैमित्तिक आनंदाचें चिन्ह असेल. किंवा निरुपद्रवी निरागस थट्टेचें चिन्ह असेल. किंवा छद्‌मी निंदेचेंहि चिन्ह असेल. तें खरें चिन्ह कशाचें हें जो हसला व ज्याला हसला या उभयतांच्या नित्यसंबंधावर किंवा प्रासंगिक परिस्थितीवर अवलंबून असतें. थंडीच्या दिवसांत दोघे शेजारी घरांतून बाहेर पडून हात चोळीत उन्हांत येऊन उभे राहिले म्हणजे एकमेकांकडे पाहून सहज हसतात. दोघांनाहि त्या उन्हांत उभें राहण्यानें सुख होतें. आणि 'जसा तूं तसाच मी' इतकें जाणविण्याचें म्हणजे सहानुभव–सहानुभूति प्रगट करण्याचें काम तें हसणें करितें. पावसाळ्यांत चिखली रस्त्यांतून मोटारवाल्यानें बेदरकार गाडी हाकली, म्हणजे बाजूच्या लोकांच्या कपड्यावर घाणीचा छानदार शिडकाव होतो. आणि ज्या दोघांचे कपडे खराब झाले त्यांची दृष्टादृष्ट झाली म्हणजे तेहि एकमेकांकडे पाहून असेच हसतात. कारण दोघांच्याहि मनांत त्या मोटारवाल्याला देण्याकरितां त्याच शब्दांच्या शिव्या उभ्या राहिलेल्या असतात. हेंहि सहानुभूतीचेंच हास्य.

पण छद्‌मी निंदाव्यंजक असेंहि हास्य असतें. ऊन्ह नसतांना छत्री उघडून चालणाऱ्या माणसाला आपण हसतों. मात्र तें त्याला दिसावें अशी इच्छा नसते. एखादा मनुष्य गबाळ्यासारखा रस्त्यानें चालला— त्याचा कासोटा लोंबतो आहे, किंवा त्याच्या उपरण्याचें टोक रस्त्याचा केर काढीत चाललें आहे, हें पाहून आपण हसतों. तसेंच एखाद्यानें खूपच ऐटबाज पोषाख नट्टापट्टा केला आहे, करकर बूट वाजवीत चालला आहे, उगीचच गळ्यांतला फास ( नेकटाय ) सावरतो आहे, उगीचच वरच्या खिशांतला हातरुमाल काढून तोंड पुसतो आहे, असें दिसलें तर तें पाहून आपण हसतों.

तसेंच द्वेषहि हसण्यानेंच प्रगट करितां येतो. मारणारानें मारतांनाहि हसावें हें काणिक नीतीचें वचन प्रसिद्धच आहे. मारण्याला उद्युक्त

होण्यापर्यंत मजल गेली नसली तरी, आपला वैरी किंवा प्रतिपक्षी रस्त्यांत भेटला असतां हस्तीदंती करण्याचा मोह आपणांला आवरत नाहीं. या ठिकाणीं शिष्टाचाराची सवय द्वेषबुद्धीबरोबरच प्रभावी होते. मात्र या हसण्याचा अर्थ 'चालला आहे लेकाचा पाजी, कांहीं तरी हलकट काम करण्याला' किंवा 'बरं आहे बचाजी, मीहि पाहून घेईन' असाच असतो कीं नाहीं ?

पण मला बोलावयाचें आहे तें असल्या दूषित हसण्यासंबंधानें नाहीं. केवळ ओळख दर्शविणाऱ्या निर्हेतुक हसण्यासंबंधीं मी बोलत होतों. ओळखीचा कोणी भेटला कीं हात वर उचलले जातात, व तोंडावर हसण्याची लकेर येते, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. मला वाटतें इतर प्राण्यांमध्यें देखील असाच शिष्टाचार असावा. कारण समोरासमोरून येणाऱ्या दोन मुंग्या तोंडाला तोंड लावल्याशिवाय पुढें जात नाहींत. कुत्रींहि तशींच. मात्र या मुखस्पर्शाच्या वेळीं 'कां कसं काय आहे' अशा अर्थाचे कांहीं शब्दहि ते प्राणी उच्चारतात कीं नाहीं हें समजण्याला मार्ग नाहीं इतकेंच.

'कसं काय आहे' या मराठी शब्दांना इंग्रजींतहि शब्द आहेत व ते 'How do you do' असेच आहेत हें पाहून मौज वाटते. पण हीं दोनहि वाक्यें प्रश्नार्थी नाहींत तर केवळ उद्गारवाचक आहेत ! यांत खरोखर एकमेकांना समाचार विचारण्याचा हेतु फारसा नसतो. मग 'ईश्वरकृपेनें या क्षणाला तुम्ही आम्ही जिवंत आहों' इतकाच त्याचा अर्थ असल्यास न कळे. 'नमस्कार' हा शब्द त्याच अर्थी आहे. हल्लीं हिंदी भाषेचा पगडा बसत चालल्यानें 'नमस्ते' हा शब्द रूढ होत चालला आहे. फरक इतकाच कीं 'नमस्कार' हा आपण नुसता हातांनीं करतो, पण नमस्ते हा शब्द उच्चारला म्हणजे प्रत्यक्ष हात जोडावे लागत नाहींत. परवां शाळा सुटून घरीं परत जाणाऱ्या दोन परकरी मुली रस्त्यांत दिसल्या. त्यांच्या घराची वाट फुटली तेव्हां 'नमस्ते' असें म्हणून त्यांनीं तोंडें फिरविलीं. हें पाहून मी मनांत

म्हणालों, 'ठीक आहे. लहान मुलींच्याहि अंगीं शिष्टाचाराचें वळण बाणूं लागलेलें दिसतें. कांहीं वाईट नाहीं.'

पण 'कसं काय आहे' हें वाक्य प्रश्नार्थी नसून केवळ उद्गारवाचक असतें हें ध्यानांत न राहिल्यानें, तो प्रश्न आहे अशी समजूत करून घेऊन त्याचें उत्तर देणारा भेटला म्हणजे मौज होते. याचीं उदाहरणं सांगतों.

गुंडोपंत व मीं परवां आपापल्या कामाला घाईनें जात असतां रस्त्यांत भेटलों. सहज नमस्कार करून मी म्हणालों 'कसं काय आहे.' आणि पुढं झटकणार, तों लगेच त्यानें मला हाताला धरून उभें केलें आणि आपली कहाणी सांगण्याला सुरवात केली. तो म्हणाला, "आग लावा त्या स्त्री-शिक्षणाला. त्यानं आमच्या सगळ्या समाजांची घडी विघडवली. सुखाचा जीव दुःखाचा केला. पूर्वीं मुली अशिक्षित होत्या पण त्यांचीं लग्न कशीं भराभर होऊन जात! आणि बायकांना शिक्षण नव्हतं तरी संसार काय कमी सुखाचे होते? आणि आतां त्या शिक्षण घेतात पण लग्नानंतर त्याचा कांहीं तरी उपयोग करतात का? आणि संसाराचा गाडा वाहतां वाहतां त्यांना वेळ तरी कुठं होतो शिक्षणाचा उपयोग करायला? शिकल्या तरी हात दोनच पाय दोनच. बरं शिकल्या म्हणून मुलं व्हायचीं राहतात असंहि नाहीं. आमच्या बचीला नव्या चालीप्रमाणं शिकवावं म्हणून १६ वर्षांपर्यंत लग्नाची ठेवली. पण आतां २२ वर्षांची झाली तरी नवराच मिळत नाहीं तिच्या मनाजोगा! या सहा वर्षांत त्या पूर्वीच्या वीस वर्षांत न पडलेले कष्ट मला पडले. पण काय हो? तुम्ही येवढे समाजाचे पुढारी म्हणवितां? तुम्ही कां नाहीं या सामाजिक संकटाविरुद्ध चळवळ करून उठत? पण तुम्हांला राजकारणापुढं सुचेल तर ना! बरं, तुमचं देव भलं करो. पण त्या सोनोपंत डबीरांच्या मुलग्याची तुम्हांला कांहीं माहिती आहे का? २७ वर्षांचा आहे म्हणतात. एम्. ए. पर्यंत शिकला आहे. पण म्हणे डोळे थोडे अधू आहेत. पण काय झालं तेवढ्यानं? सगळ्यांचेच

डोळे कुठें एकसारखे चांगले असतात? याचा काहीं खुलासा काढावा म्हणून, आपले ते नेत्रवैद्य नाहींत का—सुविख्यात—सुविख्यात कसचे ! मोठी सोनेरी पाटी दुकानावर लावली कीं झाले सुविख्यात. यांच्या पाटीचा खर्च निघण्याकरितां एक रुपया फी—जास्ती ! पण करतां काय ? त्यांनीं डबीरांच्या मुलाच्या डोळ्यांबद्दल खात्री करून दिली पाहिजे असं बबीचं म्हणणं. करतां काय? दोनदां गेलों, गाठच पडत नाहीं. बरं गिऱ्हाइकाची इतकी गर्दी कीं बसायला टीचभर जागा नाहीं. कसा तरी एका बाकाच्या कोपऱ्यावर टेकलों तर ढेकणांनीं खाऊन टाकलं. हे लोक लोखंडी बाकं कां ठेवीत नाहींत? किर्लोस्करांचीं बाकं चांगलीं आहेत म्हणतात. होतं का आमंत्रण तुम्हांला त्यांच्या परवांच्या समारंभाला ? मला होतं अन् जायचंहि ठरविलं होतं. पण मोटारींत सीटच मिळेना. कां तर पेट्रोल कमी म्हणून गाड्या कमी सुटतात. काय पहा जगभर येवढ्या युद्धाला पेट्रोल मिळतं. पण हिंदुस्थानाला तेवढा दुष्काळ ! पण कालचं युद्धाचं वर्तमान ऐकलंत का ? मोठ्यानं बोलायची सोय नाहीं—"

मला असं झालं कीं कुठून गुंडोपंताला नमस्कार केला आणि कसं काय आहे असं म्हणालों !

दुसऱ्या एका प्रसंगीं पाहिलं तर असंच. आले होते एक मुंबईचे गृहस्थ, ते असेच रस्त्यांत भेटले. खरं म्हटलं तर त्यांची माझी ओळख बेताचीच होती. पण रस्त्यांत भेटलं ओळखीच्यासारखं मनुष्य म्हणजे नको का नमस्कार करून 'कसं काय आहे' म्हणायला ? झालं. त्याला वाटलं कीं मी त्याला त्याचं सुख-दुःख आस्थेवाईकपणानं विचारलं. आणि माझ्याहिपेक्षां अधिक आस्थेवाईकपणानं त्यानं सांगायला सुरुवात केली कीं ! तो म्हणाला, "आहे बाबा तूर्त आमच्या धंद्याला तेजी ! गेले दोन महिने सकाळीं ९ वाजतां जातों तों रात्रीं ८ वाजतात घरीं परत यायला. शेअर बाजारांत कोण गर्दी ! पण तुम्हांला म्हणून सांगतों कीं आमच्या तीर्थरूपांनीं शेअर बाजारा-

च्या धंद्याचं शिक्षण मला दिलं त्याचा उपयोग झाला. मीं या दोन महिन्यांत किती लाखांची उलाढाल केली असेल असं तुम्हांला वाटतं? साडे पंधरा लाखांची. आणि ट्रेड सीक्रेट कुणी कुणाला सांगत नाहीं पण तुम्हांला म्हणून सांगतों, कीं एक दीड लक्ष रुपये कमावले! अजून कांहीं वायदे पुरे व्हायचे आहेत म्हणा. पण आली आहे अटकळ चांगली. तुम्हांला कोणी होतकरू मुलगा असला तर, मी सांगतों, मुंबईस त्याला कुणाकडं तरी कांहीं दिवस ठेवून या धंद्यांत घाला. शेअर बझार म्हणजे सोन्याची खाण आहे. तुमच्या वरच्या दोन पिढ्यांत मिळाला नाहीं इतका पैसा तो दोन वर्षांत मिळवील. पण मुंबईत पैसा मिळविला तरी तो खर्चायला पुण्यांतच यायला पाहिजे म्हणा! मी तरी आज कशाला आलों आहे म्हणतां पुण्याला? चांगल्या मोकळ्या हवेशीर जागेंत एक अर्धा एकर जागा घेऊन आपली लहानशी पंचवीस तीस हजारांत एखादी झोपडी बांधतां येईल का पाहण्याकरितां. पण तुम्ही पुण्याचे लोक—दाद लागूं द्यायचे नाहीं. जागांची चौकशी करायला गेलों तर त्यांत सतरा भानगडी निघायच्या. ती 'इनामदार अ‍ॅन्ड को.' जमिनीचे घरांचे व्यवहार करणारी कंपनीची जाहिरात असते, तिची आहे का माहिती तुम्हांला? नाहीं तर आम्ही आपले मुंबईकर भंपक म्हणून घालतील एखाद्या गोंधळांत. पैशापरी पैसे गेले आणि जागा ताब्यांत यायला तीन वर्षे! मला तरी घाई इतक्याचकरितां, कीं एका मुलाची प्रकृति बरी नाहीं. बारीक ज्वर येतो. डाक्टर म्हणतात वेळींच इलाज करा. आमचा तो मुलगा नं. २ चा तुम्ही पाहिलाच असेल. गतवर्षींच लग्न केलं. मुलगी चांगली मिळाली आहे मनाजोगी!"—

आतां मी काय करूं सांगा. 'कसं काय आहे' हें नुसतं ओझरतं बोललों ही काय माझी चूक झाली? नाहीं. पण त्याचं असं आहे कीं कांहीं कांहीं वेळां माणसं आपापल्या सुखदुःखांच्या विचारांनीं मनांत इतकीं भारावून गेलेलीं असतात, कीं ते विचार कुठं तरी कुणापाशीं तरी बोलून टाकल्याशिवाय त्याना हलकं वाटतच नाहीं.

याला दृष्टान्त सुचला तो सांगतों. पुण्याच्या गांवांत बाहेरगांवांहून येणाऱ्या एक-दोन रस्त्यांवर दोन चार ठिकाणीं पुरुषभर उंचीचे दगडी चौथरे बांधलेले आहेत. प्रथम मला वाटे कीं कोणत्याहि घराशीं संबंध नसलेल्या जागेंत रस्त्यालगत हे उंच चौथरे बांधण्याचा व्यर्थ खर्च कुणी कां केला ? मग एक दिवस त्या प्रश्नाचें उत्तर कोणी न सांगतां मिळालें. अशाच एका चौथऱ्याजवळ येतांच, कोथरुडाकडून येणाऱ्या एका बाईनें फळें व भाजी यांनीं जड झालेली डोक्यावरची पाटी उभ्या उभ्या या चौथऱ्यावर ठेवली. आपला घाम पुसला. थोडें हुश्श्‌ केलें. दोनचार मिनिटें उगीच उभी राहिली. कनवटीची जस्ताची लहानशी डबी काढून तपकिरीची चिमूट ओढली. आणि फिरून ओझ्याची पाटी डोक्यावर घेऊन ती शहराकडे निघाली. तेव्हां माझ्या लक्षांत आलें, कीं कोणा तरी परोपकारी गृहस्थानें अशा गरीब ओझेवाल्यांकरितां हा चौथरा बांधून सोय केली असली पाहिजे. ओझ्याच्या भारानें थकून गेलेल्या स्त्री-पुरुषांना विश्रांतीकरितां ओझें उतरून ठेवण्याची आवश्यकता असते. ओझें उतरून वाकून जमिनीवर ठेवतां येतें. पण फिरून तें उंच उचलून डोक्यावर त्यांचें त्यांना ठेवतां येत नाहीं. त्यांना हात लावायला माणूस तरी कोण भेटणार ? आणि भेटला तरी त्याला हाक मारून पाटीला हात लावा म्हणायचा त्या बायाबापड्यांना सहजच संकोच वाटतो. आणि कित्येक माणसें अशीं तालेवार किंवा बेदरकार असतात, कीं त्या गरीब ओझेवाल्यांच्या पाटीला हात लावण्याइतकी माणुसकी त्यांच्याजवळ नसते. अशा वेळीं हे बिचारे दगडी चौथरे तें परोपकाराचें काम करितात.

तें पाहून मी मनांत म्हणालों कीं 'कसं काय आहे' हा प्रश्न या दगडी चौथऱ्यांसारखाच, कांहीं लोकांना आपल्या विचारांचें जड ओझें क्षणभर उतरून ठेवायला, उपयोगी पडत असला पाहिजे. आणि तेव्हांपासून तो प्रश्न विचारण्याचें टाळण्याऐवजीं मी तो मुद्दाम आवर्जून विचारूं लागलों. वाटलें कीं आपला थोडा वेळ फुकट जाईल. पण

कोणा भारपीडिताला आपल्या मनाचें ओझें हलकें करण्याला संधि मिळेल. मात्र हा उपद्रव नकोसा वाटतो तेव्हां तो टाळण्याला मी एखादवेळ युक्ति करतों ती अशी, कीं माझ्या या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या मिषानें आपल्या गोष्टीवेल्हाळपणाच्या पोत्याचें तोंड सोडणारा असा एखादा गृहस्थ दुरून दिसला, कीं मी रस्त्याच्या दुसऱ्या अंगाला जाऊन चालूं लागतों. हेतु हा कीं, दृष्टादृष्ट झालीच तर दुरून नुसत्या हस्तीदंतीनें काम भागेल, पण त्याची नसती कर्मकथा ऐकावी लागणार नाहीं.

'कसं काय आहे' हा भलेपणाचा शिष्टाचाराचा उद्‌गार नसून प्रश्नसा कुणाला वाटला तरी 'ठीक आहे' इतकेंच उत्तर समर्पक ठरतें. प्रश्नाला फारसा अर्थ नाहीं तसाच उत्तराला ! पण कांहीं लोकांना तो आस्थेवाईक प्रश्नसा वाटून ते कशीं आस्थेवाईक उत्तरें देतात हें वर दर्शविलेंच आहे. ही आपत्ति टाळण्याला तोंड चुकविणें हा जालीम उपाय ठरतो. पण तो न साधला तर निदान 'कसं काय' असा प्रश्न, भेटणाऱ्या दोघांपैकीं कुणी तरी एकानं करावयाचा तो, आपण न करतां दुसऱ्याला तो करण्याचा मान द्यावा, व उत्तर देण्याची जबाबदारी आपणाकडे घ्यावी. तसें झाल्यास उत्तर द्यावयाचें तें किती औपचारिक त्रोटक द्यावयाचें हें आपल्या हातीं राहतें.

कसं काय म्हणण्याऐवजीं नुसत्या नमस्कारावर भागवितां आलें तर चांगलें. तो दुरूनहि करून निघून निसटून जातां येतें.

पण या शिष्टाचारालाहि कसोटी लागण्याची वेळ येते. असं घडतं कीं एका रस्त्यावर गांठ पडून, नमस्कार चमत्कार झालेला मनुष्य आणि आपण यांची गांठ फिरून दुसऱ्या रस्त्यावर पांच-दहा मिनिटांनीं पडते. पण तेव्हां मात्र आपण एकमेकांना नमस्कार करीत नाहीं. याचं कारण हेंच कीं दिवसांतून प्रथम भेटीला उरकण्यापुरताच हा शिष्टाचार असतो.

मनुष्य हा स्वतःच त्याचा खरा व नित्याचा टीकाकार होय ! त्याचं मन हाच त्याच्यामागं ईश्वरानं जन्मापासून लावून दिलेला कायमचा साक्षीदार किंवा गुप्त पोलिस असतो !

---

## गुणिषु न च लिंगं न च वयः ५

थोड्या दिवसांपूर्वी अमेरिकेंतील एका कोर्टांत एका नटीनें नुकसान-भरपाईचा दावा आणला. त्यांत तिच्या वयाचा एक मुद्दा निघाला. मालकानें तिचा पगार वयावर ठरविला होता कीं नाट्य-नैपुण्यावर हें माहीत नाहीं. पण नटीची साक्ष झाली तेव्हां प्रतिवादीचा वकील उलटतपासणींत म्हणाला 'बाईसाहेब, आपलें वय काय आहे?' नटीला तिचें वय माहीत नसेल काय? पण तिला तें सांगावयाचें नव्हतें. तथापि सत्यप्रतिज्ञेवर साक्ष देण्याची शपथ तिनें घेतलेली. म्हणून खोटें बोलण्याचें धाडसहि तिला करवेना. तेव्हां ती म्हणाली "मला माझें वय माहीत नाहीं."

हें म्हणणें खोटेंच नसेल काय? पण 'माहीत नाहीं' अशा मोघम उत्तरानें अडचणीचा प्रश्न टाळतां येतो. 'तें तिला माहीत होतें' असें शाबीत होईल तेव्हांच खोट्या साक्षीचा गुन्हा पदरांत येणार!

"पण बाई, तुम्हीं आपला जन्म-नोंदीचा कागद कधीं पाहिला नाहीं काय?"

"नाहीं."

हें मात्र शक्य आहे.

"पण तुमच्या आईबापांनीं तुमचें वय काय हें तुमच्यादेखत दुसऱ्या कोणाला पूर्वीं सांगितलेंच असेल!"

प्रश्न अगदीं गळ्याशीं आला. तेव्हां नटीनें वकिलाकडून न्याया-धिशाकडे मोर्चा फिरविला आणि म्हणाली, "हा पुरावा ऐकीव म्हणून अग्राह्य ठरत नाहीं काय, न्यायाधीशसाहेब?"

न्यायाधीश हसून म्हणाला, "होय ही तक्रार योग्य आहे." या दाव्यांत शेवटीं वादी नटीचें वय कांहीं ठरलें कीं नाहीं माहीत नाहीं. पण न्यायाधीश मात्र तारुण्य सोडून फार पुढें गेला नसावा अशा बेताचें त्याचें स्वतःचें वय असावें असें अनुमान करण्यास मला हरकत वाटत नाहीं. कारण पुराव्याच्या कायद्याच्या तत्त्वाप्रमाणेंहि प्रतिवादी वकिलाच्या प्रश्नाचें सरळ उत्तर नटीकडून येतें तर तो पुरावा ग्राह्य ठरता.

पण कदाचित् न्यायाधिशाच्या लक्षांत हें आल्यामुळें तो हसला असेल कीं, "या नटीचा जन्म अविवाहित शरीरसंबंधामुळें घडला असेल. अशा अपितृक मुलीच्या जन्माची नोंद कोण ठेवणार? ती केव्हां जन्मली याची माहिती मुलीला सांगण्याची गोष्ट अप्रिय म्हणूनहि आईनें मुलीला सांगण्याचें टाळलें असेल! आणि बापाची व तिची कधीं भेटच झाली नसेल!"

स्त्रियांना त्यांचें वय विचारणें यासारखी शिष्टताभंगाची दुसरी गोष्ट नाहीं असा संकेतच ठरून गेलेला आहे ना तिकडच्या देशांत! आतां न्यायाच्या कामांत असले संकेत चालत नाहींत हें वेगळें. पण ते संकेत न चालले तरी न्यायाधीश तरुण भेटले तर काय इलाज?

हो! त्या नटीला आमच्या संस्कृत कवीचें वचन माहीत असतें तर ती असेंहि म्हणती कीं 'गुणिषु न च लिंगं न च वयः'! आणि या वचनाच्या आधारावर 'मला मुळींच वय नाहीं' असेंहि ती नटी म्हणती तरी चाललें असतें! कारण ती अमेरिकन नटी ना! गुण-वती अमेरिकन नटी! तें असो. पण निदान 'गुण हे वयावर अवलंबून नसतात, म्हणजे लहानाच्याहि अंगीं गुण असूं शकतात' असा या

संस्कृत वचनाचा बरोबर अर्थ करूनहि ती म्हणूं शकती—'पाहा हा संस्कृत कवि देखील माझ्या अल्प वयाची साक्ष देत आहे. कारण मी गुणसंपन्न आहे'!

माझ्या शेजारीं बसलेला मित्र मला खवचटपणानें म्हणाला, 'का हो, कांहीं उमद्या प्राण्यांचें वय त्यांचे दात पाहून ठरवितात तसें या नटीचें ठरवितां आलें नसतें काय?' त्यावर मी म्हणालें, 'त्या नटीच्या दातांची ओळख मालकाला असेलच. पण तो पडला आतां प्रतिवादी. शिवाय नटीचे दात सगळे कृत्रिम असतील किंवा सोन्याच्या पत्र्यानें मढविलेले असतील किंवा भरीव सोन्याचेहि. नटीच ती! तिला पैशाला काय कमी? पण कृत्रिम दातांवरून वयाची परीक्षा कशी होणार?'

जाउं द्या. हो स्वार्थी नटी आपण सोडून देऊं. पण स्वतःचें वय बरोबर माहीत नसणारे लोक जगांत काय थोडे असतात? तरी अज्ञान-सज्ञान हा भेद कायदेशीर व्यवहारांत महत्त्वाचा ठरतो म्हणून, किंवा सरकारी नोकरींत कांहीं एका वयापलीकडे कोणाला ठेवतां येत नाहीं म्हणून, वयाची चिकित्सा प्राप्त होते, आणि खरें माहीत नसलें तर वय खोटें लावूनच ती अडचण थोडीबहुत टाळतां येते. एरवीं तुमचें वय वीस काय—चाळीस काय—सारखेंच!

युरोपांत अमेरिकेंत घरच्या बायबलमध्यें सर्व मुलांच्या जन्मतिथि टिपून ठेवण्याची चाल आहे. आमच्या इकडे जन्मपत्रिका टिपणें ठेवतात. पण ही गोष्ट सुशिक्षित सुखवस्तु लोकांत घडून येते. गरीब अडाणी लोकांत कसल्या पत्रिका आणि टिपणें? मूळांत असलीं तरी तीं गहाळ होतात. शिवाय चांगलीशी नोकरी चालून आली, किंवा विमा कंपनीकडे वय सांगण्याची पाळी आली, म्हणजे हवी तशी हुकमी टिपणें तयार करून मिळतातहि! लग्नाच्या कामीं पत्रिका पाहणारे लोकहि आतां या टिपणांवर विश्वास ठेवीनासे झाले आहेत!

कांहीं लोक तर जवळच्या पत्रिका फाडून टाकतात! आमचे मित्र वासुकाका जोशी यांनीं मला एक दिवस खरोखरच सांगितल्याचें स्मरतें कीं, त्यांना आपलें वय नक्की माहीत नाहीं, आणि त्यांच्याजवळ

जन्मपत्रिका होती ती ज्योतिषावरील अविश्वासामुळें त्यांनीं फाडून टाकली! ते म्हणतात—नुसत्या वयाला काय महत्त्व आहे म्हणून तें लक्षांत ठेवायचें? आणि तें खरेंच आहे.

वासुकाकांचें म्हणणें बरोबर आहे असें मला वाटतें. पण माहीत असलेलें खरें वयहि सांगतांना मुद्दाम आगें मागें करून सांगण्यांत कांहीं हेतु असतो. बहुधा असें अनुभवाला येतें कीं स्त्रियांची प्रवृत्ति वय कमी सांगण्याकडे आणि पुरुषांची प्रवृत्ति वय जास्ती सांगण्याकडे असते. कारण स्त्रियांना तारुण्य हा अभिमानाचा हेतु असतो. तसा प्रौढपणा हा पुरुषाच्या अभिमानाचा हेतु असतो. आणि या अभिमानाची अतिशयोक्ति लक्षांत येऊनच कोणा प्रतिभावान् मनुष्यानें ही चटकदार म्हण बनविली असावी कीं—"नायकिणींचें वय गोसाव्यांनीं चोरलें."

अर्थ उघड आहे. नायकिणींना आपण नेहमीं तरुण आहों असें भासवावें लागतें. आणि गोसाव्यांना आपण वयोवृद्ध आहों असें भासवावें लागतें. आतां नायकिणीला आपलें वय खालीं उतरवितां उतरवितां किती खालीं नेतां येईल याला सहजच मर्यादा पडूं शकते. कारण फार जूनपणाप्रमाणें फार कोवळेपणाहि तिच्या कामीं पडत नाहीं! पण गोसाव्याचें मात्र तसें नाहीं. आणि आपलें वय शंभरावर आहे असें सांगणारे कांहीं, फार काय तें शेंकड्यांनीं मोजावें लागेल असेंहि भासविणारे एक दोन, बैरागी आम्हीं पाहिले आहेत. एकानें तर डोळे फाडून मजकडे रोखून पाहून असा आव आणला कीं, 'मी अमर चिरंजीव आहे.' अश्वत्थामा, बळी, व्यास, हनुमान यांचा जोडीदार! मला वाटलें कीं बरें झालें, हा रामअवताराच्या निदान कृष्णावताराच्या कांहीं हकीकती स्वतःच्या माहितीनें सांगेल. श्रीकृष्णाच्या तोंडून कुरुक्षेत्रावर अर्जुनाला सांगितलेली गीता स्मरणांत असलेला जर एखादा चिरंजीव इकडे आला, तर गीतेंतले श्लोक कांहीं कांहीं प्रक्षिप्त आहेत कीं नाहींत, इत्यादि कूटप्रश्नांचा वाद थांबेल!

थिऑसफीच्या मताप्रमाणें हिमालयांतले कांहीं ऋषिमहात्मे असेच

चिरंजीव आहेत, व ते हिमालयांतील अदृश्य गुहांत बसून आपल्या पुण्याईचें बळ भरतभूमींतील आश्रितांना देतात! त्यांना जुने ऋषिप्रणीत ग्रंथ जे आज लुप्त झाले आहेत ते मुखोद्गत असतात. खरोखर असा एखादा महात्मा लाभेल तर काय बहार होईल? निदान हस्तदोष समाविष्ट झालेलीं हस्तलिखितें जमवून संशोधन करीत बसण्याचें कारण उरणार नाहीं.

दोन वर्षांपूर्वीं एक गृहस्थ, इंदूरकर ओक शास्त्री नांवाचे, पुण्यास आले होते. त्यांचा सिद्धान्त असा कीं, मनुष्यानें प्रयत्न केल्यास त्याला शतायुषीच काय पण 'अमर'हि होतां येईल! ते गंभीरपणानें त्या सिद्धान्ताचा मतप्रचार व्याख्यानद्वारा करीत होते. मी त्यांना म्हणालों, "तुमच्या सिद्धान्ताविषयीं अविश्वास धरण्याचें पाप मी कशाला करीन? मला इतकेंच भय वाटतें कीं, कांहीं उपायांनीं माणसें अमर होऊं लागलीं म्हणजे मग जगांत मनुष्यें मावायचीं नाहींत. कांहीं समाजांत मृत माणसें पुरण्याची चाल आहे. तींच आजवर इतकीं पुरलीं गेलीं व त्यांनीं इतकी जागा व्यापली कीं, कालांतरानें अनेक स्मशानें किंवा मृतभूमि मुद्दाम किंवा अजाणतां नांगरून वसाहतीला आणल्या गेल्या नसत्या, तर जिवंतपणीं माणसें माणसांवर रचण्याची पाळी येती!"

डेक्कन जिमखान्याच्या पांचवडाजवळच्या जागेंत असाच प्रकार झालेला आहे म्हणतात. तात्पर्य, मनुष्य अमर नाहीं हें चांगलेंच आहे—इतरांच्या दृष्टीनें. आणि स्वतः त्याच्या दृष्टीनें तरी, कांहीं मर्यादेपलीकडचें म्हातारपणचें जगणें कुठें सुखाचें असतें? 'अंगं गलितं पलितं मुंडं दशनविहीनं जातं तुंडं। वृद्धो याति गृहीत्वा दंडं परं न मुंचत्याशापिंडं!' हें काय जिणें म्हणावें?

पण पुरुषांनीं जसा वयोवृद्धत्वाचा तसाच स्त्रियांनींहि अल्पवयत्वाचा अभिमान धरून खोटें वय सांगू नये हेंच बरें! कारण वयावर काय आहे? अंगांत गुण असेल तर लहान वयांतच कीर्ति मिळून जाईल. बरें वय पुष्कळ झालें म्हणून काय? त्यामुळें स्त्रियांच्या अंगच्या गुणांना बाध येणार नाहीं. आतां पुरुषाचें जितकें वय अधिक तितकें

शहाणपण अधिक हें खरें नाहीं. तसेंच, वय झालें म्हणून कर्तृत्व नष्ट होईलच असेंहि नाहीं. कांहीं म्हातारीं माणसें आपल्या बुद्धीनें उद्योगानें तरुणांनाहि लाजवितातच ना! गांधी कर्वे पाहा!

पक्षाभिमानानें हवें तें म्हणावें इतकेंच. बुद्धि व प्रतिभा यांची चमक प्रथम तरुणपणांतहि प्रगट झाल्याशिवाय राहत नाहीं हें खरें. पण ही चमक दाखवून कांहीं व्यक्ति अल्पायुषी ठरून मेल्या म्हणून तारुण्य हाच कर्तृत्वाचा काळ असें ठरत नाहीं. 'ईश्वर ज्यांवर प्रेम करतो त्यांना तो अल्पवयांत आपणाकडे नेतो' ही एक नुसती चटकदार व गोड सांत्वनपर म्हण आहे इतकेंच. पण गुणवंत वृद्धांवरहि ईश्वराचें प्रेम नसण्याला काय कारण? उलट सरळ त्रैराशिकानें वरील म्हणीनें हिशेब करीत गेलों तर मग असें म्हणावें लागणार नाहीं का, कीं जीं मुलें उपजतांच मरतात किंवा मेलेलींच उपजतात तींच ईश्वराचीं सर्वांत अधिक लाडकीं!

वृक्षांना नवे कोंब फुटणें, फुलें येणें, या गोष्टीला प्रथमच ते लहान असतां प्रारंभ होतो तेव्हां त्यांचें कौतुक होणें स्वाभाविक होय. पण वृक्ष प्रौढ होतो तेव्हांच त्याला फळें येऊं लागतात. आणि तो वाढून त्याला शाखा फुटतात व पानांनीं भरून जातात, तेव्हांच त्याच्या छायेंत मनुष्य उभा राहून उन्हाचा ताप निवारूं शकतो. वृक्ष जून झाला व पुरा वाढला म्हणजेच त्याचें खरें ऐश्वर्य पाहून घ्यावें. बुंधा? हत्तीला साखळदंडानें बांधून ठेवतां येईल असा. विस्तार? एक हजार माणसें त्याच्या छायेंत बसून सुखानें विश्रांति घेतील असा! आणि त्याच्या कुशींत वाटेल तितक्या पक्ष्यांनीं आश्रय घ्यावा. तरी पण त्याच्या टोकावर फुलें व फळें येतच असतात.

गडकरी म्हणतात, 'तरुणपणीं मनुष्याला मतें व मिशा एकदमच फुटूं लागतात.' पण गोऱ्या तोंडावर पेन्सिलीनें रेखाटल्यासारखी फुटलेली मिसूर कुणीकडे? आणि प्रौढपणीं ओठ व गाल झाकून कानाच्या पाळीपर्यंत वाढलेल्या मिशा कल्ले कुणीकडे?

आणि जर का दाढी वाढूं दिली, केसाळपणाचें वरदान असलेल्या माणसानें, तर मग बोलायलाच नको !

तरुणपणचें कर्तृत्व ठिणगीसारखें तर प्रौढपणचें वृद्धपणचें कर्तृत्व धुमसणाऱ्या दमदार विस्तवासारखें. ठिणगी कापसाच्या बोळ्यावर लवकर विझते; दमदार विस्तव पुष्कळ वेळ टिकतो. चकमक झाडून ठिणगी पाडली तर चिलीम पेटून तंबाकूची क्षणभरची तलफ भागते. पण सुगृहिणीनें रात्रीं चुलींत पेटवण घालून धुमसत ठेवलेल्या विस्तवानें सकाळीं घंगाळभर ऊन पाणी आंघोळीला मिळतें !

परवां सहज टाइम्स बुकक्लबचें चरित्रसंग्रहाचें पुस्तक हातीं पडलें तें चाळतांना प्रत्येक चरित्रविषयक व्यक्तीचें जन्मवर्ष व मृत्युवर्ष हीं दिलेलीं आढळलीं. त्यावरून कोणकोणत्या वयोमर्यादेपर्यंत जगलेले लोक किती याची मुद्दाम गणनाच मीं केली. त्यांत असें आढळलें कीं, नामवंत माणसांमध्यें प्रौढ व म्हातारीं होऊन मेलेलींच अधिक. अगदीं तरुणपणीं आपले गुण प्रगट करून चटका लावून सोडून गेलेलीं थोडीं. या शंभर लोकांच्या वयांच्या गणनेचा हिशेबच याखालीं देतों; व त्यांपैकीं सुप्रसिद्ध अशी कांहीं थोडीं नांवेंहि सांगतों. बहुश्रुत लोकांना ती खास माहीत असलींच पाहिजेत.

| | | |
|---|---|---|
| १० ते २०—१ | जोन ऑफ आर्क | (१९) |
| २० ते ३०—१ | कवि शेले | (३०) |
| ३० ते ४०—५ पैकीं | अलेक्झांडर | (३३) |
| | बायरन | (३६) |
| | क्रांतिकारक रोबेस्पियर | (३६) |
| ४० ते ५०—६ पैकीं | नेल्सन | (४७) |
| | संशोधक क्यूरे | (४७) |
| | क्लाइव्ह | (४९) |
| ५० ते ६०–२४ पैकीं | नेपोलियन | (५२) |
| | पीटर दि ग्रेट | (५३) |

| | | |
|---|---|---|
| | कोलंबस | (५५) |
| | प्रे. लिंकन | (५६) |
| | सीझर | (५८) |
| | केमालपाशा | (५८) |
| | क्रॉम्वेल | (५९) |
| ६० ते ७०–२३ पैकीं | सर वाल्टर स्कॉट | (६१) |
| | अरिस्टॉटल् | (६२) |
| | मार्टिन ल्यूथर | (६३) |
| | कार्ल मार्क्स | (६५) |
| | लॉर्ड बेकन | (६५) |
| | सम्राट् अशोक | (६८) |
| ७० ते ८०–२३ पैकीं | साक्रेटिस | (७०) |
| | राणी एलिझाबेथ | (७०) |
| | मार्को पोलो | (७०) |
| | डार्विन | (७३) |
| | पाश्चूर | (७३) |
| | गॅरिबाल्डी | (७५) |
| | डॉ. जॉन्सन | (७५) |
| | ग्यालिलियो | (७८) |
| ८० ते ९०–११ पैकीं | बिस्मार्क | (८३) |
| | फ्रांकलिन | (८४) |
| | व्हॉल्टेर | (८४) |
| | एडिसन | (८४) |
| | आयझॅक न्यूटन | (८५) |
| ९० ते १००–२ पैकीं | फ्लॉरेन्स नाइटिंगेल | (९०) |
| | सर ख्रिस्तोफर रेन | (९१) |

लांबून जवळ म्हणजे इतर जगाकडून महाराष्ट्राकडे आलों तर मात्र कर्तृत्वसंपन्न माणसांचा आयुर्दाय कमी दिसतो. उदाहरणार्थ—

२० ते ३० थोरले माधवराव

३० ते ४० चिमाजी अप्पा, भाऊसाहेब पेशवे

४० ते ५० पहिला बाजीराव, नानासाहेब, परशुरामभाऊ पटवर्धन

५० ते ६० दादासाहेब पेशवे, नाना फडणवीस, गोपाळराव पटवर्धन, जिऊबादादा बक्षी

६० ते ७० महादजी शिंदे, हरिपंत फडके, सखारामबापू, अहल्याबाई होळकर, मोरोबा फडणीस

७० ते ८० दुसरा बाजीराव, मालोजी घोरपडे, मानाजी फडके, मल्हारराव होळकर, ताराबाई भोसली.

आतां आधुनिक महाराष्ट्रीयांपैकीं विष्णुशास्त्री चिपळूणकर (३२), वामन शिवराम आपटे (३४), आगरकर (३९), नामजोशी (४३), टिळक (६४). त्या अलीकडे मात्र ६०–७० वर जगलेले बरेच आहेत.

तात्पर्य, गुण हे वयावर अवलंबून नाहींत; व बोध हा आकड्यावर अवलंबून नाहीं हेंच खरें.

# बोलण्या बोलण्यांत फरक आहे ६

'इंग्रजांनीं हिंदुस्तानांत राज्य जिंकून घेतलें तें मुसलमानांपासून, आहे ठाऊक?' प्रोफेसर अकबर म्हणाले.

'भलतंच कांहीं तरी. त्यांनीं तें मराठ्यांच्याच हातून जिंकून घेतलं.' प्रोफेसर शिवनारायण उत्तरले.

नवलपूर कॉलेज प्रोफेसरांच्या मधल्या सुट्टींतील विश्रांतीच्या खोलींत दोघां प्रोफेसरांत जोराजोरानें वाद चालू होता.

**प्रो. शिव**—'तुमचा इंग्रज इतिहासकार सर विल्यम हंटरच काय म्हणतो पहा ना! तो 'हिंदुस्तानचा इतिहास' या पुस्तकांत लिहितो— 'The British won India not from the Moughuls but from the Hindoos. Before we appeared as conquerors the Moughul Empire had broken up. Our wars were neither with the Delhi kings, nor with his revolted governors, but with Marathas and Sikhs."

**प्रो. अक**—'हंटर काय वाटेल तें म्हणो. पण हें खरें ना, कीं सन १८१८ त मराठेशाही बुडाली? पण दिल्लीची मोगल पातशाही

मात्र १८५७ पर्यंत नांवानें तरी टिकून होती! मराठे हे कांहीं कधीं हिंदुस्तानचे बादशहा नव्हते.'

प्रो. शिव—'मराठे बादशहा नसतील. पण जे बादशहा होते त्यांचें संरक्षण सैन्याच्या बळावर कोण करीत होतें? महादजी शिंदेच ना, अखेर अखेर? बादशहा हे मराठे सरदारांच्या हातचें बाहुलें होउन राहिले होते. मराठे जिंकले गेल्यावर मग पातशाही जिंकायला काय उशीर?'

प्रो. अक—'पण बादशहांचे दिवाण किंवा प्रतिनिधि मराठे नव्हते! दिवाणीच्या सनदेनें इंग्रजांनीं तो अधिकार आपणांकडे घेतला होता.'

प्रो. शिव—'पण नुसत्या दिवाणीला घेऊन काय करावयाचें! मुलकी दिवाणापेक्षां लष्करी सेनापति हेच राज्याचे आधारस्तंभ असतात. ते स्तंभ कोसळले म्हणजे राज्याची इमारत कोसळते. नेपाळांत काय, जपानांत काय, सेनापति हेच राज्याचे मुख्याधिकारी मानले जात होते व आजहि तसे मानले जातात. राजे बादशहा हे स्वतःच सेनापति असले तर गोष्ट वेगळी. तात्पर्य, हिंदुस्थानांत इंग्रजांनीं राज्य घेतलें तें आम्हां हिंदूंपासून; तुम्हां मुसलमानांपासून नव्हे.

प्रो. अक—'पण तुम्ही विसरतां कीं कोणत्याहि महत्त्वाच्या हुकुमावर राजा-बादशहाचाच सही-शिक्का व्हावा लागतो. तरवारीनें भोक पडतें पण छाप उठत नाहींना! सेनापति घोषणा ग्वाही करितो ती स्वतःच्या नांवानें नसते, तर गादीवर असलेल्या राजाच्या पक्क्या हुकुमानेंच होते. पेशवाई नष्ट झाल्याचा जाहीरनामा महाराष्ट्रापुरता होता. तो १८१८ सालीं निघाला. पण त्यानंतर १८५७ पर्यंत बादशाही टिकून होती. 'खुल्क खुदाका, मुलूख बादशहा का, अमल अंग्रेज का' या घोषणेंत मराठ्यांचें नांव तरी आहे काय?'

हा वाद ऐकून मी आपणाशीं हसत होतों. मनांत म्हणत होतों, 'आपण बोलतों यांतून अंतिम ध्वनि काय निघतो हें यांच्या लक्षांत येईल तर हे बोलतात तसें न बोलतां उलटें प्रतिपादूं लागतील!'

मग प्रो. अकबर व प्रो. शिवनारायण दोघेहि वादांत विश्रांति

घेण्याला थोडे थांबले. त्यांच्या युक्तियुद्धांतील तीरांचे पहिले भाते संपले व ते भाते पुन्हा भरण्याची तयारी ते करीत आहेत, असें पाहून मीं हळूच आपलें घोडें पुढें घातलें. मी म्हणालों, "प्रो. अकबर, तुम्ही मुसलमानांच्या अभिमानानें बोलत आहां ना?"

"अलबत."

"आणि प्रो. शिवनारायण, तुम्ही हिंदूंच्या अभिमानानें बोलत आहां ना?"

"अर्थातच."

"पण मला सांगा, कीं ज्या कोणाकडून इंग्रजांनीं राज्य 'जिंकून' घेतलें तें त्यांचा 'पराभव' करूनच घेतलें ना? ते युद्धांत 'नामोहरम' ठरले, लष्करी सामर्थ्याच्या दृष्टीनें 'नादान' ठरले, असाच शेवटीं अर्थ निघतो ना? आणि हा अर्थ त्यांच्या स्तुतिपर ठरतो कीं निंदापर व दूषणपर?"

"मग हेंच स्तुतिपर ठरण्याला तें आम्हीं कसें म्हणायला पाहिजे होतें तें तरी सांगा कीं." दोघेहि किंचित् आपली चूक लक्षांत येऊन पण अडविण्याच्या हेतूनें म्हणाले.

मी म्हणालों, "तुम्ही, अकबरसाहेब, असें म्हणायला पाहिजे होतें कीं इंग्रजांपूर्वीं या देशांत मुसलमान हेच राजे होते. आणि तुम्ही, शिवनारायणसाहेब, असें म्हणायला पाहिजे होतें कीं, इंग्रजांपूर्वीं हिंदुस्थानांतील सर्व लष्करी सत्ता हिंदूंनीं आपल्या हातीं आणली होती. असें बोललां असतां दोघेजण, तर ती मुसलमान व मराठे यांची स्तुति ठरली असती. अकबरसाहेब, आज इंग्रजांकडून अधिक हक्क मागण्याच्या दृष्टीनें तुम्ही मुसलमानांच्या बादशाहीचा उल्लेख केला. आणि 'मुसलमानांचें राजकीय महत्त्व उरलें नव्हतें, म्हणून त्यांना प्रमाणाबाहेर बिनहिशेबी फाजील अधिकार देण्याचें कारण नाहीं' ही तक्रार करण्याच्या दृष्टीनें तुम्हीं, शिवनारायणसाहेब, मराठ्यांच्या लष्करी वर्चस्वाचा उल्लेख केला. पण बोलतांना दोघांनींही इंग्रजांकडून

झालेला पराभवच सांगितलात कीं नाहीं ? आजच्या लाभाच्या इच्छे-मुळें जुन्या पराभवाच्या अपमानाची कबुली दिलीत ? ”

इतर सर्व प्रोफेसर मंडळी हसूं लागली. तेव्हां मी म्हणालों, “ याचें उदाहरण म्हणून, मी थोडे दिवसांपूर्वी एक गमतीचा प्रकार पाहिला तो सांगतों तुम्हांला ! ”

मी सांगूं लागलों.

नाताळाचा दिवस होता. स्टेशनवर प्रवासी लोकांची गाडींत शिरण्याची गर्दी रेटारेटी चालू होती. एक गोरा साहेब चिरूट फुंकीत प्लॅटफॉर्मवर आला व आपल्या डब्याशीं गेला. पाहतों तों त्याच्या नोकरानें सामान मांडून ठेवण्यांत कांहीं चूक केली होती. ती पाहून तो संतापला. परत फिरला. त्यानें आपल्या नोकराला हुडकून काढलें. आणि तो दिसतांच त्याच्या अंगावर धावून जाऊन त्यानें त्या गरीब नोकराला बुटाच्या लाथांनीं बेदम मारलें व परत येऊन आपल्या डब्यांत शिरला. थोड्या वेळानें, या डब्याच्या टोकाशीं, ‘नोकरांकरितां राखीव जागा’ अशी पाटी लावलेलें एक कंपार्टमेंट होतें त्याच्या तोंडाशीं हमरी तुमरी सुरू झाली. एक भलता उतारू या कंपार्ट-मेंटांत शिरूं पाहत होता व हा मार खाल्लेला नोकर त्याला दाराशीं अडवीत होता. मोठी बाचाबाची, शिवीगाळ, गुद्दागुद्दी सुरू झाली. गाडी सुटण्याची वेळ झाली. गाडीचा गार्ड जवळ आला व हा काय प्रकार आहे याची चौकशी त्यानें केली. साहेबाचा नोकर म्हणाला, “ या उतारूला या जागीं बसण्याचा हक्क नाहीं. ती जागा साहेबांच्या नोकरांकरितां राखून ठेवलेली आहे. हा उतारू साहेबाचा नोकर नाहीं.”

उलट तो उतारू म्हणाला “ हा तरी प्रवासी साहेबाचा नोकर कशावरून ? याच्या अंगावर डगला-बिल्ला कांहीं तरी खूण आहे का ? हा खोटें सांगतो.”

तेव्हां नोकर म्हणविणाऱ्याला गार्ड म्हणाला, “ काय रे, तूं तरी साहेबाचा नोकर कशावरून ? ”

नोकर म्हणाला “ वा! गार्डसाहेब. आतां इतक्यांतच माझ्या साहेबानें मला बुटाच्या लाथा मारून बेदम केलें तें काय मीं त्यांचा नोकर नसतों तर केलें असतें काय? विचारा हवें तर त्या पलीकडच्या डब्यांतल्या उतारूंना. नाहीं तर मला लाथांच्या मारांतून सोडविणाऱ्या त्या पोलीस शिपायाला? काय सांगूं, गार्डसाहेब, लाथा खाल्ल्यानें माझें अंग अजून ठणकतें आहे. हे पहा अंगावर वण उठले आहेत; आणि हा म्हणतो मी साहेबाचा नोकर नाहीं! या कंपार्टांत बसायचा श्रेष्ठ हक्क मलाच आहे. याला नाहीं. तुम्हीच न्याय करा.”

गार्डानें शेजारच्या शिपायाला विचारलें तेव्हां तो म्हणाला, “ हा नोकर अगदीं खरें बोलतो. त्यानें खूपच लाथा खाल्ल्या! अगदीं बुटाच्या! मीं त्याला सोडवला नसता तर आज त्याची धडगत नव्हती.”

या पुराव्यावर न्याय झाला. लाथा खाणारा तो साहेबाचा नोकर ठरला, आणि त्याला त्या राखीव कंपार्टमेंटांत बसायची परवानगी मिळाली. आणि त्या दुसऱ्या उतारूला गार्डानें घालवून दिलें. साहेबाच्या नोकरानें हक्काची सोईची जागा मिळविली. कारण साहेबाच्या बुटाच्या लाथा खाल्ल्याची कबुली दिली पण तीच आपल्या उपयोगी पडली. म्हणून त्याला आपल्या तोंडानें आपण उच्चारलेल्या अपमानाचें कांहीं वाईट वाटलें नाहीं. पण सोईच्या जागेची लाभाची आशा सोडता तर त्याला आपला अपमान झाकून ठेवतां आला नसता काय? निदान स्वतःच्या तोंडानें बोलून दाखविण्याची पाळी येती ना!

मी पुढें त्या प्रोफेसरद्वयांना आणखी म्हणालों, “ इंग्रजांनीं आपल्या हातून राज्य घेतलें असें म्हणण्यांत मुसलमान काय, मराठे काय, दोघांनाही सारखाच कमीपणा नव्हे काय? आणि त्या कमीपणाचा हक्क सांगून त्यांनीं एकमेकांशीं नव्या हक्कासाठीं भांडावें? उलट इंग्रजांच्या मनांत दोघांनाहि सारखे यथान्याय हक्क देण्याचें आलें, किंवा न आलें, तर पूर्वीं मुसलमान बादशहा व त्यांचे मराठे संरक्षक

दोघांच्याहि हातून आम्हीं राज्य जिंकून घेतलें असें ते म्हणतील व वाटेल त्या प्रकारें हक्काची वाटणी करतील."

तात्पर्य काय, बोलण्या बोलण्यांत फरक असतो.

आम्ही पूर्वी प्लेगच्या दिवसांत पुण्याबाहेर रानांत कँप व क्लब करून राहत होतों. त्या दिवसांत माझ्या एका स्नेह्याच्या ओळखीनें एक वृद्ध मनुष्य, कडेकर नांवाचा, आमच्याकडे येई, आणि जातांना गांजाकरितां चार आणे मागून घेऊन जाई. त्याचें नांव गांवांत 'श्रीमंत नं. १०' असें पडलें होतें, व तोहि तें स्वतःस अभिमानपूर्वक लावून घेई. त्याचें कारण विचारतां स्नेह्यानें जें माहितीपूर्वक सांगितलें तें बोधप्रद वाटून आम्हीहि त्याला, पुढें केव्हां तो आला म्हणजे, 'या श्रीमंत नं. १०' अशी हाक मारूं लागलों.

या नांवाचा प्रकार असा कीं, या पूर्व'श्रीमंता'च्या पण आजच्या गरिबाच्या घरची श्रीमंती लखपतीची होती. पण दुर्दैवानें त्याच्या अंगच्या दुर्गुणांनीं ती सर्व श्रीमंती गेली, व तो इतका कंगाल झाला कीं वेळेला अन्न मिळेना. मग गांजाचें व्यसन जडलें तेव्हां अन्नापेक्षां गांजाकरितां भीक मागण्याची पाळी आली. आम्ही त्याला चार आणे देत असूं याचें कारण हें कीं, तो स्वतःसुद्धां इतर नऊ मिळून पुण्यांतलि गेल्या साठ वर्षांतील दहा श्रीमंतांचीं वर्णनें मोठ्या रसाळ अलंकारिक वाणीनें करी. तें वर्णन ऐकून आम्हांला हसतां हसतां पुरे वाट होई. पण त्यानें कधीं त्यांना किंवा आपल्याला पुढें प्राप्त झालेल्या दुःस्थितीचें वर्णन केलें नाहीं. तो म्हणे, 'दारिद्र्याचें वर्णन तें काय करावयाचें? तें माझ्या रोडक्या शरीरावरून व कंगाल वेषावरून तुम्हांला दिसतेंच आहे. तुम्हांला माहीत नाहीं ती माझ्या जुन्या श्रीमंतीची स्थिति. म्हणून माझें व त्या नऊजणांच्या श्रीमंतीचेंच खरें वर्णन मीं सांगत असतों. दैवाला कधीं दोष देत नाहीं. कधीं केविलवाणें बोलत नाहीं. दुसऱ्यांनीं कसें बुडविलें हें सांगत नाहीं.'

तेव्हां मी मनाशीं म्हणे, "हा तत्त्वज्ञानी पण स्वाभिमानी आहे खरा. याच्या उलट मृच्छकटिकांतला तो चारुदत्त मला आवडत नाहीं.

कारण जेव्हां पाहावें तेव्हां तो स्वतःच्या दारिद्र्याचें वर्णन स्वतः करून रडतो. कोणी तें त्याचें मनोविश्लेषण म्हणेल; पण तें मला पटत नाहीं. याच नाटकांत त्याच्या पूर्वीच्या औदार्याचीं वर्णनें इतरांच्या तोंडून आलीं आहेत त्यावरून अप्रत्यक्षपणें त्याच्या दारिद्र्याचें उठावदार वर्णन होतें तेंच तेवढें उदात्त वाटतें. 'याचकांनीं ओंजळीनें पाणी पिऊन पिऊन आटविलेलें श्रीमंतीचें सरोवर' असें चारुदत्ताचें वर्णन परस्पर लोकांच्या तोंडून झालेलें गोड वाटतें. तसेंच आनंदाची बातमी आणणाराला कांहीं तरी बक्षीस द्यावें म्हणून चारुदत्तानें आपल्या अंगावरून हात फिरवला, पंण कोठें एकहि अलंकार नाहीं हें लक्षांत येऊन वर पाहून त्यानें फक्त दीर्घ निःश्वास सोडला, हें त्याचें परकर्तृक मार्मिक गोड वर्णन किती शोभतें? आतां चारुदत्त स्वतःच्या श्रीमंतीचें वर्णन करीत त्या कल्पनानंदांत झुलत बसला आहे असें दाखविण्यांतहि स्वारस्य नव्हतें. पण स्वतः त्यानें आपल्या दारिद्र्याची एकसारखी चालविलेली चर्चा-चिकित्साहि शोभत नाहीं.

चारुदत्ताचे कांहीं उद्‍गार कसे आहेत पहा!

"दारिद्र्यापेक्षां मला मरण अधिक आवडतें. कारण मरण हें फार थोडा वेळ क्लेश देणारें आहे, पण दारिद्र्याचें दुःख कधीं न संपणारें असें असतें."

"दारिद्र्यानें मनुष्य निर्लज्ज होतो. निर्लज्जपणानें तेज नाहींसें होतें. तेज संपलें कीं पराभव पाठोपाठ ठेवलेलाच. पराभवानें दुःख किती होत असेल? दुःखानें बुद्धि क्षीण होते. आणि बुद्धि नष्ट झाली म्हणजे क्षय काय दूर आहे? तात्पर्य, दारिद्र्य, निर्धनता हें सर्व संकटांचें माहेरघरच होय."

"निर्धनता हें चिंतेचें घर होय. तो मोठाच पराभव होय. वैरासारखें तें हात धुऊन मागें लागतें. मित्र तिरस्कार करूं लागतात. स्वजनहि विद्वेष करूं लागतात. मग निर्धन मनुष्याला सहजच वनवास पत्करण्याची बुद्धि कां होऊं नये? घरची बायको देखील अव्हेर

अपमान करूं लागते. शोकाचा अग्नि निर्धनाला पूर्णपणें जाळून टाकता तरी बरें. पण नाहीं. तो नुसता धुमसत राहून संताप देतो."

चारुदत्ताचे याहून थोडे बरे वाटणारे, कारण उच्च भावनेचे, उद्‌गार म्हणून खालील देतां येतील.

"मला दारिद्र्याचें एरवीं इतकें वाईट वाटत नाहीं. वाईट वाटतें तें इतक्याकरितांच, कीं आमच्या घरीं आतां सत्कार होऊं शकत नाहीं म्हणून अतिथि येण्याचे थांबले. हत्तीच्या गंडस्थळांतील मद झिरपेनासा झाला म्हणजे भ्रमर त्याला सोडून जातात तसे."

"द्रव्यवैभव नष्ट झालें याचें मला तितकेंसें वाईट वाटत नाहीं. कारण भाग्यक्रमानें धन मिळेल तसें नाहींसेंहि होईल. वाईट वाटतें तें याचेंच,—मित्रहि दुरावतात."

यानंतर आणखी एक उतारा. त्यांत दुःखभावनाच आहे. पण जुन्या श्रीमंतीची अभिमानास्पद आठवण तरी आहे. तो उद्गार असा—

"ज्या माझ्या वाड्याच्या पडवीवर चमचमीत पक्वान्नें पडून हंस व सारस आदिकरून मातबर पक्षी तो बलि खाण्याकरितां धावून येत, त्या ठिकाणीं आतां नुसतें गवत उगवून माजलें आहे, आणि उगीच धान्याचे चार दाणे बलि म्हणून फेकले जातात ते किड्यांच्या भक्ष्यस्थानीं जातात!"

चारुदत्ताला दारिद्र्याचें वाईट वाटण्याला दुसरेंहि एक पण नाजुक कारण झालें होतें. तो म्हणतो—"अरे, ही वसंतसेना! पण आतां काय उपयोग? दारिद्र्य प्राप्त झालें, वैभव नष्ट झालें, अशा वेळीं तिनें मजवर आपलें प्रेम प्रगट केलें व माझ्याहि मनांत तिजविषयीं प्रेम उत्पन्न झालें. पण तें आतां मनांतल्या मनांतच जिरून जाणार!"

मात्र या वेळीं चारुदत्ताला वसंतसेनेच्या निःस्वार्थी शुद्ध प्रेमाची परीक्षा झाली नव्हती. तो तिला अन्याय करीत होता.

खरें बोलावयाचें तर चारुदत्तापेक्षां इंग्रज कवि व प्रहसनकार गोल्डस्मिथ याच्या 'Good Natured Man' मधील 'हनीवुड' हा मला अधिक आवडतो. सबंध नाटकांत त्याच्या तोंडीं दारिद्र्याच्या

निंदानिषेधाचा एक शब्दहि नाहीं. उलट या आपत्तीमुळें येणाऱ्या संकटमय प्रसंगांत तो अत्यंत धीरोदात्तपणाचें वर्तन करितो. त्याच्या औदार्याचें व त्यामुळें आलेल्या दारिद्र्याचें सर्व वर्णन इतरांकडून परस्पर होतें.

अरे हो, पण या विषयांतरांत आमचा दरिद्री गांजेकस कडेकर, श्रीमंत नं. १०, हा आपल्या दारिद्र्याचा उल्लेख न करतां श्रीमंतीच्या गतवैभवाचें वर्णन कसें करी तें सांगायचें राहिलेंच! तें आतां सांगतों—

तो म्हणे—"काय विचारतां महाराज! दिवाणखान्याचे शिसवी खांब नेहमीं तेल लावल्यानें असे तुळतुळीत असत कीं, त्यांत तोंड पाहून घ्यावें! मला कपडे करायचे मनांत आलें कीं, वारांनीं मोजून मलमल विकत आणायची नाहीं, तर आखबंद ठाणांनीं. जुने म्हणून नोकरांना देऊन टाकलेले कपडे इतके मातबर असत कीं, ते पाहून आमचा शिंपी त्यांना म्हणे 'अरे, तुमच्या धन्यानें तुम्हांला नवे कपडे, शिवले ते माझ्याकडे शिवायला कसे नाहीं आले?' घरच्या कुणबिणींना जुनेरें म्हणून एक दोनदां वापरलेलीं महेश्वरी लुगडीं मिळायचीं! तीं नेसायला त्याच बिचाऱ्या लाजत. मला बायको मिळाली होती तिची मजल खर्चिकपणांत माझ्याहि पुढें. नाच-गाण्याशिवाय आठवडा जायचा नाहीं. एकदां मीं चुकून टाकून दिलेलें नोटांचें पुडकेंच गड्याला केराच्या टोपलींत मिळालें! उन्हाळ्यांत माडीवरच्या ग्यालरींत ठेवलेल्या बर्फाचें पाणी होऊन तें खालीं गटारांत वाहूं लागलें म्हणजे म्युनिसिपालिटीचा पाण्याचा नळ कुठें फुटला आहे असा शोध सुरू होई. सवाई माधवरावांच्या लग्नांतला दाखला काढून त्यांतील मेजवान्यांच्या सर्व पक्वान्नांची एक आवृत्ति घरीं वर्षांतून एकदां तरी निघाली पाहिजे अशी माझी सक्त ताकीद असे. नवा दागिना कोणता करायचा हें विचारायला जव्हेरी महिन्यांतून एक खेप टाकी. तसेंच गांवांत आलेल्या नव्या कनोजी अत्तरवाल्याची हजेरी माझ्या घरींच प्रथम लागायची! अहो महाराज, असें केल्याशिवाय का एक लाखाची इष्टेट दोन वर्षांत खलास होते!"

"आणि हें बोलत असतांनाच तो बिचारा आमच्याकडून लाचारीनें गांजाकरितां मागून घेतलेली पावली कनवटीला खुशाल लावी !

"तात्पर्य काय, प्रोफेसर अकबर अन् प्रो. शिवनारायण, तुम्ही जुन्या मुसलमान हिंदु रियासतींच्या वैभवाचें वर्णन करावयाचें सोडून, इंग्रजांनीं आपापल्या बापजाद्यांचा पराभव करून, त्यांना नादान ठरवून, हिंदुस्थानचें राज्य मिळविलें हें आजच्या क्षुद्र हक्कांच्या अभिलाषेनें सांगत बसतां हें बरें का ? प्रो. अकबर, तुम्ही अकबरच्या वेळच्या दिल्ली पातशाहीच्या वैभवाचें वर्णन करावें. आणि तुम्ही प्रो. शिवनारायण, अटकेला लागलेल्या हिंदूंच्या झेंड्याचें व त्या वेळच्या हिंदुसेनासमुद्राचें वर्णन करावें. हिंदु व मुसलमान दोघांच्याहि पूर्ववैभवाची आठवण व आधार देऊनच, १९१६ सालच्या लखनौ येथील राष्ट्रीय सभेंतील स्वराज्याच्या मागणीविषयीं पहिलाच झालेला ठराव, दे. भ. सुरेंद्रनाथ बानर्जींनीं मांडला होता, आणि जिनासाहेबां-नीं त्या ठरावाला संमति दिली होती. तसेच आज एक होऊनच त्याच आधारावर स्वराज्य मागा !"

---

# गावमामा ७

तो हसतमुख, खालीं पाहत, धिमीं पावलें टाकीत रस्त्यानें चाललेला मीं पाहिला कीं मला फार आनंद होतो. पण तो मलाच काय, आमच्या गावांतल्या सगळया माणसांना आवडतो. त्यांतल्या एकाशींहि त्याचें वाकडें नाहीं. किंवा त्यांतल्या एकाचेंहि त्याच्याशीं वाकडें नाहीं. त्याला गावांत घर नाहीं. घरचें कुटुंब मुलें-माणसें कोणी नाहींत. तरी पण सर्व गाव त्याला गावचा वतनदार रहिवासी मानतो. आणि तोहि गावांतल्या सगळ्या लोकांना आपले सगेसोयरे मानतो.

रस्त्यानें भेटला म्हणजे मी त्याला म्हणतों, 'काय मामा, कसं काय आहे ?' कीं तो हसून हात जोडून उत्तर देतो 'आनंद आहे.' यांतल्या 'नं' या अक्षरावर त्याचा जोर नेहमीं पडतो. पण तें अक्षर तो किती लांबवून म्हणतो यावरून त्याच्या आनंदाच्या तीव्रपणाची किंवा गाढपणाची कल्पना मला करितां येते. तो नेहमीं मोजक्या शब्दांनीं बोलतो. पण लहर आली म्हणजे विनोदाच्या भरांत गोष्टीवेल्हाळहि होतो.

माझी त्याची प्रथम गाठ पडली त्याचा प्रसंग असा घडला. तांग्याच्या मागच्या भागीं बायका-मुलांना बसवून मी पुढें तांगेवाल्याच्या डाव्या हाताला बसलों होतों. गळयाभोंवतीं गुंडाळलेल्या माझ्या

उपरण्याचें टोक, तांग्याच्या बावखडीच्या लोखंडी दांड्यावरून, चाकाच्या आऱ्यांना स्पर्श करीत होतें. आणि जर का ते आणखी थोडें घसरून चाकांत सापडतें तर चाकाच्या एखाद-दुसऱ्या फेऱ्यांत मला गळफासच बसायचा कीं! पण इतक्यांत समोरून येणाऱ्या जनूमामाला तें दिसलें. तो आडवा येऊन घोड्याच्या तोंडासमोर उभाच राहिला. घोडा थांबला. काय झालें म्हणून मीं विचारतां त्यानें उपरण्याचा घोटाळा माझ्या नजरेला घातला. तेव्हां आज एक अपघात टळला अशी माझी खात्री झाली.

त्याचा गरीबी वेष पाहून कृतज्ञताबुद्धीनें त्याला कांहीं द्यावें म्हणून मीं खिशांतून पाकीट काढलें. हें पाहून तो नुसतें हसला, व 'वः असं कुठं झालंय काय' इतकें बोलून बाजूनें सटकन निघूनहि गेला. त्याच्या या निःस्वार्थी परोपयोगी—परोपकारी हा मोठा शब्दहि मी लावूं इच्छीत नाहीं—वृत्तीनें माझ्या मनाची पकड घेतली. आणि त्या दिवसापासून तो मनानें माझा मित्र बनला. पण त्याआधीं त्यानेंच मला मनानें मित्र मानलें नसतें तर, माझ्या वेंधळेपणानें माझ्या उपरण्यामुळें मजवर येणारें संकट त्यानें कां टाळलें असतें!

खरेंच आहे. रस्त्यानें माझ्यासमोरून येणारे इतर लोक काय थोडे होते? त्यांपैकीं नाहीं कुणाला माझें उपरणें दिसलें! कुणाला कां नाहीं माझ्या संकटाची जाणीव झाली? कुणी कां नाहीं मला सावध केलें? पण जातिवंत परोपयोगित्वाची बुद्धि उपजत असते कीं काय कुणाला ठाऊक? त्यांतले कोणी माझा गलथानपणा पाहून मनांत हसले असते. फार काय माझ्या गळ्याला फास बसून मीं गडबडलों हें पाहूनहि कांहीं हसले असते. पण जनूमामाची माणुसकीची जातच वेगळी होती.

पुढें जनूमामा रस्त्यांत भेटला कीं मी मुद्दाम थांबून आवर्जून त्याच्याशीं बोले. तांग्यांतून उतरूनहि बोले. 'काय कुठं गेलां होतां' 'कुठं चालला' असें विचारी. पण अमक्या कामाहून आलों किंवा अमक्या कामाला चाललों असें त्यानें मला कधींच सांगितलेलें आठवत

नाहीं. 'चाललों होतों सहज' येवढेंच उत्तर मिळे. तथापि पुढें पुढें असें होऊं लागलें कीं आज जनूमामानें अमक्याचें अमुक काम केलें, तमक्याचें तमुक काम केलें, अशी बातमी कळे. हें काम कांहीं उपयोगाचें उपकाराचें असे. पण गुप्तदानाचें व्रत जनूमामानें स्वतःच्या तोंडानें कधीं मोडलें नाहीं.

जनू हा गावमामा होता. त्याला स्वतःची बहीण नव्हती. मग भाचा नव्हता हें काय सांगायला पाहिजे? तथापि सगळ्या गावाशीं त्यानें मामा-भाच्याचें नातें जोडलें होतें म्हणाना! कुणाचेंहि नव्हे तें सर्वांचें होऊं शकतें ना! या ठिकाणीं मला श्री. कृ. कोल्हटकर यांच्या 'सहचारिणी' नाटकांतील जनार्दन या पात्राची आठवण होते. मीहि प्रस्तुत निबंधाला जनूमामा हेंच नांव उसनें घेतों आणि नाटककारानें जनूमामाचें दिलेलें वर्णन वाचकांना सादर करितों.

नाटकांतील रावजी या पात्रानें जनार्दनला म्हटलें 'तुम्ही गावमामा दिसतां. पण तुमचें वय लहान आहे.' तेव्हां जनार्दनानें उत्तर दिलें —"अहो गावमामा असायला गावकऱ्यांच्या आयांचा भाऊ थोडेंच असावें लागतें? जो इसम गावकऱ्यांच्या नेहमीं उपयोगी पडेल, त्यांच्या खस्ता खाईल, तो त्यांचा मामा होऊन बसतो. लोकांचीं कामें फुकट करणें हाच त्याचा धंदा असतो. निरोप सांगणें, लग्नें जुळविणें, उत्सवांत व समारंभांत हेलपाटे घालणें, लोकांचा बाजारहाट करणें, चैत्रांत गौरी सजविण्याची खटपट करणें, पानसुपारी वाटण्यांत मदत करणें, हरिदासाच्या मागें तंबुरा मृदंग किंवा टाळ वाजविणारा नसल्यास आपण उभें राहणें, प्रेताला खांदा देणें, अशीं त्याचीं अनेक प्रकारचीं कामें असतात."

पण जनार्दन विनोदबुद्धीनें खोड्याहि करी. त्याचेंहि वर्णन नाटककारानें त्याच्याच तोंडीं घातलें आहे तें असें—"खोटे निरोप सांगून हेलपाटे घालायला लावणें, जवळ जवळ बसलेल्यांच्या पदरांच्या गाठी मारणें, मागील तक्या काढून घेऊन डोकें आपटावयाला लावणें, खुर्चीवरील माणूस पुढें वाकला कीं खुर्चीचे मागील पाय ओढून त्यास

पाडणें, झोपलेल्याच्या उघड्या तोंडांत बेटकुळी टाकणें, किंवा त्याच्या तोंडाला काजळ फासणें, या खोड्या तर माझ्या हातचा मळ आहेत. अंगावरून बुरखा घेऊन तर मीं कितीजणांना फसविलें आहे. तें फार सोपें असतें. फक्त आवाज बदलला कीं झालें काम!"

आमचा जनूमामाहि विनोदी आहे. पण त्यानें प्रत्यक्ष कुचेष्टा अशा कधीं केल्या नाहींत. मोठ्या माणसाच्या कुचेष्टा करण्यानें गंभीरपणा जाऊन विदुषकी नांव मिळतें व विदुषकी स्वभाव बनतो, म्हणून त्या बाजूला तो कधीं गेला नाहीं. फार तर रडव्या लहान मुलांना हसविण्याला लागेल इतकीच एखादी कुचेष्टा तो करी. पण तीहि प्रौढ माणसें कोणी आपणाला पाहत नाहींत असें न्याहाळून.

आमच्या जनूमामाचा स्वभाव गंभीर व सात्त्विक असे. आणि त्याच्या मनांत सर्वांविषयीं ममतेचा जिव्हाळा असे. माणसाप्रमाणें जनावराविषयीं देखील. मला कोणी परवां सांगितलें कीं, पांच वर्षांपूर्वीं त्यानें एक नित्यक्रम ठेवला होता. दोन प्रहरीं बारा वाजतां तो गावाच्या ठरीव भागांतून फिरे. त्या वेळीं गावांतलीं गाढवें ऊन निवारण्याकरितां वळचणींना उभी राहतात. जनूमामानें एकेक गाढवाचा कान धरावा, आणि त्याला जवळच्या एका सार्वजनिक हौदावर नेऊन बादलीनें पाणी वर काढून पाजावें. या कामांत भरउन्हांत त्याला पुरें एक तास राबावें लागे.

हें लक्षांत येऊन, गाढवें वावरण्याच्या आसपासच्या एका परोपकारी गृहस्थानें मुद्दाम गाढवांकरितां राखीव म्हणून एक उथळ हौद बांधला. कारण गाढवें उकिरड्यावर लोळतात, तरी तीं गटारांतलें घाण पाणी पीत नाहींत. गाढव तोंड घालील तें पाणी खुशाल डोळे मिटून माणसानेंहि प्यावें असें म्हणतात.

गाढवांना ही सवय होऊन मग तीं स्वतः त्या हौदावर येऊन पाणी पिऊं लागलीं. आणि गाढवें त्या पाण्यांत तोंड घालतात यामुळें इतर कोणी त्या पाण्याचा उपयोग करीतना. अर्थात् हौद तुडुंब भरून वाही. म्हणून ही देणगी देणारानें मग 'गाढवांचा हौद' अशी तेथें

पाटी लावली. पण लोक काय ? मूळ ज्याच्या परोपकारी स्वभावामुळें हा हौद बांधण्याची कल्पना सुचली, व ज्याच्या औदार्यामुळें ती मूर्त स्वरूपांत आली, त्या दोघांनाहि उद्देशून 'गाढवांचा हौद' असें मिस्किलपणें म्हणूं लागले.

जनूमामाला स्वतःचा संसार असा कांहींच नव्हता. आणि तो असता तर कदाचित् त्याला असें निष्काळजी परोपकारी जीवन लाभलें नसतें. तो स्वतःचें असें कांहीं मिळवीत नव्हता. स्वतःचें घरच नाहीं, मग मिळवून तें ठेवावयाचें तरी कुठें ? पण त्याला स्वतःचें घर नव्हतें तरी, किंवा म्हणूनच, गावांतील निदान पंधरा ऋणानुबंधी घरें त्याच्याकरितां तयार असत. तो त्यांत केव्हांहि येवो, त्याच्याकरितां एक चारपायी, त्यावर एक कांबळें अंथरायला, व एक चादर पांघरायला नेहमीं घडी करून ठेवलेली असावयाची. निजानीज होण्याची वेळ आली म्हणजे तो हळूच अभावित यायचा, आणि 'माई आलों हो' असें म्हणून त्या चारपायीवर झोपून जायचा !

त्याला माणसांची चांगली पारख असे. यामुळें आपल्यावर खरीं प्रेम करणारीं कुटुंबें कोणतीं हें त्यानें पारखून ठेवलें होतें. स्वार्थी कामापुरता लोभ दाखविणारीं असें तो ज्यांना समजे त्यांचेंहि अडलें काम तो करी. पण त्यांच्याकडून कोणताहि प्रत्युपकार घ्यावयाचा नाहीं याविषयीं मात्र तो खबरदारी घेई. लाजेकाजेनें त्यांनीं एखाद दिवस जेवायला राहा म्हटलें तरी राहायचा नाहीं. उलट ज्यांना तो खरा ऋणानुबंधी समजे त्या घरांत अवेळीं जाऊन सुद्धां तो खायला मागे. आणि 'आज जनूमामानं आपण होऊन खायला मागितलं बरं का मला' असें मोठ्या आनंदानें, अभिमानानें, त्या घरची मालकीण घरधन्याला सांगितल्याशिवाय राहायची नाहीं. ती म्हणायची 'बरा बाई आज घास सत्कारणीं लागला.' आणि तो म्हणायचा 'देव त्याचं भलं करो.'

त्यानें कुणाचें काय काम करावें याला मर्यादाच नव्हती. कोणी विनंतीपूर्वक सांगितल्यास तो करीच; पण पुष्कळसें कोणी न सांगतां

आपलीच दृष्टि चालवूनहि करी. रस्त्यानें जात असतां त्याची नजर दोन्ही बाजूंना सारखी फिरत असायची. आणि कुणाचें कुठें काय बिघडलें आहे हें आपण होऊन तें त्याला सांगून, किंवा स्वतःलाच करतां आलें तर तें करून, मग त्याला सांगून पुढें जाई. कुणाच्या तबेल्याचें फाकट उघडें पडलेलें पाहिलें तर गुरांना आंत हुसकून घालून तो कवाड लावून घेई. कुणाच्या कोंबड्या मोकाट सुटून रस्त्यांत आल्यां असल्या तर, कुत्रीं-मांजरें त्यांना मारतील म्हणून, त्या पकडून पिंजऱ्यांत नेऊन घाली. कुणाच्या बाहेरच्या मोरींतला पाण्याचा नळ उगाच सुटला असला तर चावी पिळून बंद करी व म्हणे, 'म्युनिसिपालिटीचें पाणी फुकट वाहून जातें तें तरी गावाचेंच फुकट जातें ना ! '

तो मेहनतीकरितां मोबदला घेत नसे. म्हणे 'असूं देत. ठेवून द्या तुमच्याजवळ माझे पैसे म्हणून. वेळ वखत आहे. केव्हांहि मागून घेईन कीं.' बरें घेतलेनच एखाद्या वेळीं तरी कामाच्या मानानें अगदीं हिशेबी योग्य तेवढेंच घेई. पण तेव्हांहि समजावें कीं ते पैसे घेऊन कुणाच्या तरी कामीं लावावयाचें त्यानें आधीं मनाशीं ठरवून ठेवलें असेल. एकदां त्यानें आपण होऊन मला एक पैरण मागितली. पण त्यामुळें त्याच्यावर मी उपकार करीत नसून माझ्यावरच त्यानें डोंगराएवढा उपकार केला असें वाटलें. मीं त्याला एक पैरण काढून दिली. लगेच तो म्हणाला, 'आणखीहि एक असली निकामी तर द्या कीं.' क्षणभर मी मनांत म्हणालों ' हा आणखी मागतों असं कधीं व्हायचं नाहीं.' पण लगेच त्याचा खुलासा पटला. तो म्हणाला, 'त्या पलीकडच्या बागेच्या कोपऱ्यावर एक आंधळा अनाथ भिकारी राहतो ना ! त्याला मी ती देणार आहे.'

जनूमामाच्या मनमोकळ्या स्वभावामुळें आम्हांलाहि सवय झाली होती कीं, काम पडल्यास त्याला बोलावून घ्यावें. पंचाईत इतकीच कीं तो नेमक्या वेळीं नेमक्या घरीं सापडावयाचा नाहीं. पण तो कुठें तरी कुणाचें तरी काम करीत असलेला कुणाच्या तरी दृष्टीस पडलेला

असायचा. यामुळें त्याला हुडकून काढणें कठीण नसे. पण गावांत त्याचा कुठंही पत्ता लागला नाहीं म्हणजे हटकून समजावें कीं, तो कुणाच्या तरी स्मशानयात्रेला गेला असला पाहिजे. आमच्या गावचें स्मशान बरेंच दूर असे. यामुळें खांदेकरी पुष्कळ लागत. त्यांत जनूमामा असायचाच. त्या दिवशीं तो उपोषण करी, व स्मशानयात्रे-हून दमून परत आला कीं कुठल्या तरी घरीं जाऊन त्याच्याकरितां राखून ठेवलेल्या चारपाईवर जाऊन झोप काढी.

त्यानें स्वतःकरतां मंडईत जाऊन एखादा जिन्नस खरेदी केलेला आम्हीं पाहिला नाहीं. पण एक दिवस मंडईत गेलों तों ही स्वारी एका गाळ्यावर भाजी विकीत बसलेली पाहिली. आश्चर्य वाटून मीं विचारलें, 'मामा, हें काय? एखादा गाळा भाड्यानें घेऊन दुकान घालायचा विचार केला आहे कीं काय?' तो हसून म्हणाला, 'भलतंच कांहीं तरी! मला हो काय व्यापार करून मिळवायचं? त्याचं असं झालं, आमची शुक्रवारांतली भाजीमाळीण अवचित आठा महिन्यांची बाळंत झाली. घरीं तिचं माळवं पडून राहिलं म्हणजे कुजून फुकट नाहीं का जायचं? म्हणून तें घेऊन विकायला बसलों आजच्या दिवस. उद्यांपासून करील ती आपली कांहीं व्यवस्था!' आणि मग मी गंमत पाहत उभा राहिलों तों दिसलं कीं, जसा कांहीं बागवानाचा धंदा जन्मभर करीत असावा त्याप्रमाणं तो गिऱ्हाइकाशीं दरदामाबद्दल हुजत घाली. पण त्या माळणीप्रमाणं त्यानं, खोटं वजन देण्याकरितां, तराजूची दांडी एकदां सुद्धां धक्का देऊन वाकडी केली नाहीं.

जनूमामा सहसा विनोद करीत नसे. अगदीं एखाद्याच वेळीं तो एखादी विनोदी म्हण म्हणे, किंवा कुणाला तरी लावून बोलून हळूच हसे. कारण त्याला मनुष्यस्वभावांतले दोषहि दिसत. नाहीं म्हणायला त्यानं एकदांच एक कुचेष्टा केल्याचं मीं पाहिलं. आळींतल्या मधुकर-पंतांकडे जेवणावळ होती. बरीच गर्दी झाली. पंगत निम्मी जेवून झाल्यावर कल्पना आली कीं पानसुपारीला ही खालची लहान जागा

सोडून वरच्या मोठ्या दिवाणखान्यांत दुसरी बैठक घालावी. त्याला वेळ लागणार. तेव्हां जनूमामानें वेळ मिळण्याकरितां एक युक्ति केली. बाहेरच्या अंगाला पन्नास लोकांचे जोडे होते असें पाहून, त्यानें याचा हा एक तर त्याचा हा एक असे घेऊन सगळया जोडया विजोड लावून ठेवल्या. झालें. सर्व मंडळींना आपआपले जोडीदार जोडे हुडकून काढण्यास खालच्या मजल्यावर दहा मिनिटें लागलीं. तेवढ्या वेळांत नव्या जागेंत नवी बैठक घालून झाली. ही गंमत करणारा चोर जनूमामाच आहे हें कोणाला उमगलें नाहीं. पण मीहि त्या कटांत सामील असल्यानें आम्ही दोघेजण 'असें कसें झालें बुवा' असें म्हणून हळूच तोंड लपवून हसत होतों! पण अशा निरुपद्रवी थट्टेपलीकडे जनूमामाचा विनोद कधीं गेला नाहीं.

असे गावमामा ज्या गावांना लाभतात त्यांचें भाग्य थोर म्हटलें पाहिजे. पण पुष्कळ गावांना गावमामा लाभण्याऐवजीं गावसासवाच लाभतात. मामाचें काम गांवरूपी भाच्याला प्रेमळपणें सहाय करावयाचें; त्याच्या उलट गावसासूचें काम गावरूपी सुनेला धाकांत ठेवावयाचें! या सासूनें हा अधिकार स्वतः होऊनच हातीं घेतलेला असतो. तो तिला कोणी द्यावा लागत नाहीं. ही सासू क्वचित् स्त्रीलिंगी तर क्वचित् पुल्लिंगीहि असते.

माझे पुण्यांतले एक जुने सनातनी स्नेही हे पुल्लिंगी गावसासूच्या सदरांत पडणारे होते. गृहस्थ घरचा सुखी म्हणून निरुद्योगी. सकाळीं मंडईंत एक खेप घालून, दोनप्रहरीं नैवेद्य-वैश्वदेव व सुग्रास भोजन करून, झोप काढून, तिसरे प्रहरीं बैठकीवरत क्क्याला टेकून छपरी मिशांवरून हात फिरवीत आणि पानसुपारी खात बसला, म्हणजे या गावसासूची कचेरी उघडायची. आणि मग रस्त्यानें येणाऱ्या जाणाऱ्या कोणाहि परिचिताला मुद्दामहि हाक मारून त्याच्यावर, किंवा तो ज्यांचें नांव घेऊन कांहीं हकीकत सांगेल त्याच्यावर, या सासूची शिस्त धरली जायची!

वास्तविक कोणतीच सून या सासूच्या कचेरींत तिच्यासमोर हजर झालेली कोणी कधीं पाहिली नाहीं. पण युनिव्हर्सिटी ज्याप्रमाणें गैरहजर विद्यार्थ्यांनाहि पदवी देते, किंवा स्मॉल कॉज कोर्टांत, पक्षकार गैरहजर असल्यानें एकतर्फी निकाल होऊन डी. फॉर पी. ( डिक्री फॉर प्लेंटिफ ) चा शेरा पडतो, त्याप्रमाणें या गावसासूच्या कचेरींत गैरहजर पक्षकारांवर टीकेचे निंदेचे शेरे पडायचे.

अशा कुटाळ-चावडींत कोणी कोणाचें समर्थन केलेलें आढळायचें नाहीं. आणि कोणाच्या स्तुतीचा शब्द तर कधीं कानांवर पडायचाच नाहीं. होईल ती चर्चा सर्व निंदात्मक असायची. मग या चर्चेंत सार्वजनिक व्यक्तींवर तर काय पण खासगी व्यक्तींच्या खासगी व्यवहारांवर, आचरणावर, चारित्र्यावर झोड उठलेली आढळायची. या चर्चेंत अपशब्दांना मज्जाव नसावयाचा. उलट ग्राम्य अश्लील शब्द हे टीकेच्या समर्पकतेला सहायक म्हणून खुशाल वापरले जावयाचे. ही गावसासू 'सर्वशहाणी' असल्यामुळें आंतरराष्ट्रीय राजकारणापासून गाव म्युनिसिपालिटीच्या कारभारापर्यंत तिच्या ग्राह्य नाहीं असा कोणताच विषय नसावयाचा. आणि निर्णय इतक्या ठाशीव रीतीनें दिले जावयाचे, कीं त्याविरुद्ध अपील होणेंच शक्य नाहीं असें वाटावें.

या सासूची अशी समजूत असे कीं, आपण निवाडे दिले कीं ते आपोआप पक्षकाराच्या अंगाला जाऊन भिडतात, आणि त्यांची अंमलबजावणी होते. पण खरें पाहिलें तर गावसासूच्या या कचेरीला 'कुटाळचावडी' असें नांव मिळालें होतें. आणि या चावडींत फैसला झालेल्या माणसापेक्षां त्या चावडीलाच लोकानिंदा अधिक लाभे. 'काय हो, त्या अमक्याबद्दल असें म्हणतात!' असें कानांवर आलें म्हणजे एकदम त्याला उत्तर मिळे 'कां? कुटाळचावडीवर बसायला जात असतां वाटतं? ही बातमी तुम्हीं बहुधा तिथेंच ऐकली असाल.'

या चावडीची अमलदारीण गावसासू लोकांच्या उपयोगी पडलेली कधींच कोणाला दिसली नाहीं. सार्वजनिक वर्गणी घालण्याकरितां कोणी यादी पुढें आणली म्हणजे त्यावर या गृहस्थाचा आकडा तर

पडायचा नाहींच, पण वरपासून खालपर्यंत ओळखीच्या देणगीदारांच्या नांवांची व त्यांच्या (कदाचित् कांहीं खऱ्या पण प्रायः पुष्कळशा खोट्या) पापांची उजळणी व्हावयाची.

डॉ. केतकर यांनीं 'गांवसासू' नांवाची एक कादंबरी लिहिली आहे. तींत लंडनमधील हिंदी स्त्री-समाजावर सासूपणा करणारी मिसेस कैलासनाथ नांवाची एक स्त्री कल्पून तिला गावसासू हें नांव दिलें आहे. पण अशा प्रातिनिधिक स्वरूपाच्या स्त्रिया, आत्या, मामी, काकू, मावशी, वहिनी या नांवांत नात्यानें न बसणाऱ्या, पण स्थानिक स्त्रीवर्गाला धाक लावूं पाहणाऱ्या, गावोगावीं आढळतात.

अधिकार लोकांनीं दिलेला चालविण्यांत काय पुरुषार्थ किंवा पराक्रम ! पण कोणी तो न देतां स्वतः मिळविणारांची व अमलांत आणणारांची बहादुरी खरी. पण प्रातिनिधिक अधिकार बजावण्याच्या हेतूंत व रीतींत 'गावमामा' व 'गावसासू' यांच्यामध्यें किती फरक ! एका झाडावर सगळी सुवासिक फुलेंच, तर दुसऱ्यावर सगळे काटे-कुटेच !

---

# आमची मनी मांजरी ८

माणूस मानसशास्त्र लिहितो. त्याला माणसाखेरीज इतर प्राण्यांची भाषा येत असती तर त्या शास्त्रांत आणखी किती तरी मौल्यवान् भर पडली असती ! परंतु ती भाषा न आली तरी त्यांच्या चरित्र-अवलोकनानें अशा प्राण्यांच्या मनाची कांहीं चिकित्सा करतां येण्यासारखी आहे.

त्यांतल्या त्यांत 'पाळीव' पशु-पक्ष्यांचेंच साहाय्य या कामीं अधिक होतें. वन्य रानटी पशुपक्षी मनुष्याची संगत टाळतात याचें एक कारण हें असावें कीं, या संगतींत त्यांना भूक भागण्याचें साधन मिळावें तितकें मिळत नाहीं. मनुष्यप्राणी हा मांसाहारीहि असला तरी त्याचें मुख्य अन्न धान्य, भाजीपाला, फळफळावळ हेंच असतें. हत्ती व डुकर यांसारखे पशु केवळ शाकाहारीच होत. वन्य पक्ष्यांपैकीं कांहीं थोडे शाकाहारी व मांसाहारी असे दोन्ही प्रकारचे असतात. पण पुष्कळ पशुपक्षी केवळ मांसाहारीच असतात. यामुळें या बहुतेकांचें मनुष्य-संगतींत निभत नाहीं. शिवाय कांहीं पशुपक्ष्यांत स्वातंत्र्याची हौस फारच प्रबळ असते. तात्पर्य, मनुष्याच्या संगतींत राहणारे प्राणी फार थोडे. वन्य पशु-चरित्र शिकारी लोकांच्या दृष्टीस पडतें पण तेंहि एकांगी.

पाळीव प्राण्यांमध्यें मुख्य म्हटले म्हणजे कुत्रा, मांजर, पोपट. आणि यांचेंच चरित्र पुष्कळसें पाहण्याला सापडतें. यामुळें त्यांचा मानसविलास समजून येतो.

मला स्वतःला आपण होऊन कोणताच प्राणी पाळण्याची आवड नाहीं. फार वर्षांपूर्वीं माझ्या घरीं एक कुत्र्याचें पिलूं पाळलें होतें. त्याला आपल्या हातानें मी स्नानहि घालीत असे. पण त्याची घाणेरडेपणाची सवय जात नाहीं हें पाहून मी कंटाळून जाई. शिवाय एक दिवस त्यानें माझ्या भारी किमतीच्या वेबस्टरच्या शब्दकोशाचा कातडी पुठ्ठा चावून कुरतडला व पुस्तकाचा नाश केला हें पाहून मीं त्याला दूर नेऊन सोडून दिलें.

एकदां एक पोपट मीं पिंजऱ्यांत कांहीं दिवस पाळला. पण त्याला पिंजऱ्याबाहेर ठेवून संभाळतां येत नाहीं असें पाहिलें; व आपल्या हौसेकरितां कोणाहि प्राण्याला जन्मभर बंदिवास घडावा हें ठीक नाहीं असें मनाला पटल्यानें मीं होऊन त्याला सोडून दिलें. 'नवलपूरचा संस्थानिक' या माझ्या कादंबरींत शेवटीं या स्वातंत्र्यप्रिय भावनेच्या स्वतःच्या अनुभवाचा उपयोग मीं करून घेतला आहे.

कुत्रा व मांजर या दोहोंपैकीं कुत्रा हा खरोखर सर्वच प्रकारांनीं घरीं पाळावा असा प्राणी आहे. त्याचा लळा माणसाला लागावा असे फार गुण त्याच्यामध्यें आहेत. अगदीं अलीकडे माझ्या हौशी नातवानें एक कुत्रा घरीं आणून पाळला. पण त्याचा प्रकार पुढें असा झाला कीं तोहि नको म्हणून मीं सोडून दिला. तो माझ्या नातवाचाच खास सांगाती होऊन राहता तर मीं त्याला नको म्हटलें नसतें. पण अनुभव असा आला कीं, तो त्या मुलाच्या संगतीपेक्षां माझीच संगत अधिक करूं लागला. मला वाटतें कीं घरधनी कोण व आश्रित कोण याचें उपजत ज्ञान कांहीं त्याला असावें! पण मी हें अहंकारबुद्धीनें तर म्हणत नाहीं ना? घरांतील नोकरांपेक्षां घरचीं मुलें व घरधनीण यांना कुत्रा अधिक मानतो; व सर्वांपेक्षांहि घरधन्याला ओळखून तो त्याची संगत अधिक चाहतो. माझा नातू या कुत्र्याला खाऊं घाली व खेळवी.

पण मी दिसलों कीं तो माझ्याभोंवतीं अधिक फिरे. मला लाड करणें आवडत नाहीं यामुळें मी त्याला कधीं खेळवीत नसे. परंतु शेवटीं येथपर्यंत मजल गेली कीं, दोन प्रहरीं जेवणानंतर मी निजलों म्हणजे तो सरळ पलंगावर चढून माझ्याशेजारीं येऊन खुशाल बसे. आणि माझी झोप मोडी! यामुळें त्याच्या या फाजील स्नेहाला व लघळपणाला मी कंटाळलों.

पण मांजर! म्हणजे मात्र मांजरी हो! बोका नव्हे. बोका क्वचितच पाळला जातो. फक्त मांजरी हीच पाळीव या सदरांत पडूं शकेल. तथापि पाळीव असून ती स्वातंत्र्यप्रियहि असते. या दोनहि स्थितींचा ती आपल्या सोईप्रमाणें पूर्ण फायदा घेते. असें घर सापडणार नाहीं कीं ज्यांत त्या घरची म्हणून एकेक मांजरी नसते. पण गांवांत संख्येनें जितकीं घरें तितकीं मांजरें हा हिशेब मात्र बरोबर ठरत नाहीं! कारण तेंच मांजर आसपासच्या पांचसात घरांत हिंडून फिरत असते. त्या प्रत्येकांत मिळेल तें खातें. मात्र असा आभास उत्पन्न करते कीं, आपण याच एका घरचें खास मांजर असें प्रत्येक घरच्या माणसांना वाटावें. पण अशी समजूत करून घेईल तो फसेल.

स्वातंत्र्य व पारतंत्र्य यांचा मेळ घालणारा प्राणी मांजराइतका दुसरा क्वचितच आढळेल. कुत्रा आपल्या गळ्याला पट्टा अडकावून घेऊन स्थानबद्ध होऊन राहण्याला राजी असतो. पण मांजर चांगलें गोजिरवाणें वाटलें म्हणून जर कोणी घरधनी त्याच्या गळ्याला बंद लावूं पाहील तर ती गोष्ट होणार नाहीं. तुम्ही लोभवून बोलवाल तर त्या वेळेपर्यंत तें तुम्हांला अंगाला हातहि लावूं देईल. मांडीवरहि घेऊं देईल. पण तें प्राण गेला तरी स्थानबद्ध होणार नाहीं.

बोक्याची गोष्ट तर बोलायलाच नको. तो माणसांची संगत तुच्छ मानतो. त्याला लोभवून बोलावून खाऊंहि घालतां येत नाहीं. तो तुमच्या घरचें खाईल, पण चोरीनें मिळेल तवढेंच. ‘एरवीं मला काय कमी आहे!’ असा त्याचा बहाणा असतो. मांजरीप्रमाणेंच मार्जारवंश वाढविण्याचें काम त्याच्याकडे असतें. आणि युरोपांत

म्हणच आहे कीं 'सारंगबहाद्दर जाईल त्या बंदरांत त्याची बायको आधींच तयार असते', त्याप्रमाणें आसपासच्या दहावीस घरच्या मांजऱ्या मिळून बोक्याचें अंतःपुर सिद्ध असतें. वाईट वाटतें तें हेंच कीं, इतका मोठा स्त्रीपरिवार असून तो एकाहि मांजरीचा धर्मपति नसतो. पण याहून वाईट गोष्ट ही कीं, तो मांजरीच्या म्हणजे स्वतःच्या पिलांचा हाडवैरी ठरतो.

'दारान् अपत्याय' हें सात्त्विक वचन तर त्याला लागू पडतच नाहीं. परंतु त्याच्या मनाप्रमाणें घडवितां आलें तर तो कदाचित् दुसऱ्याच पिढीला आपला वंशच्छेद समूळ करील ! दुसऱ्या बोक्यानें किंवा स्वतःहि जन्माला घातलेल्या शेंकडा पन्नास तरी अपत्यांचा संहार त्याच्या हातून होत असतो. कोण हा दुष्टावा ! यामुळें बोका दिसला कीं कोणीहि, मग तें मूल असो मोठें माणूस असो, हातांत दगड घेऊन त्याच्यावर फेकल्याशिवाय राहत नाहीं. त्याचा उग्र स्वभाव प्रगट करण्यासारखीच त्याच्या अंगाची ठेवणहि असते. माणसाचें जन्मसिद्ध वैर ओळखून बोका जसा त्याला पाहतांच पळून जातो त्याप्रमाणें स्त्री जातीचें मांजर पळून जात नाहीं.

आतां या माझ्या नव्या घरांत दोनतीन वर्षें परिचित झालेल्या मांजरीचा वृत्तान्त थोडासा सांगतों. या घरांत राहावयाला आल्यापासून अनेक मांजरांनीं न बोलावतां आम्हांला भेटी दिल्या. पण शेवटीं एकच माजरी घर धरून राहिली. याचें कारण कदाचित् हें असावें कीं शेजारच्या इतर घरांपेक्षां या घरीं तिच्या खाण्यापिण्याची सोय अधिक होत असावी. तथापि ती आम्हांला खास घरचीं माणसें असें मानते अशी भ्रामक समजूत मीं प्रथम करून घेतली नव्हती. आमच्या घरचें खाऊन जिभली चाटून झाली कीं स्वारी दुसरीं घरें धुंडाळायला निघायची. तेव्हां मी म्हणे, 'ओळखलें तुझें ममत्व. माणसाप्रमाणेंच तूंहि कारणापुरतीच !' तथापि ती कांहीं काळानें परतून आली असतां, देशांतराला गेलेली कन्या घरीं फारा दिवसांनीं आली म्हणजे तिच्याविषयीं वाटणाऱ्या ममतेनें आम्ही असेल तो

घास तिला खाऊं घालूं लागलों. पुढें एकंदरीनें असें दिसूं लागलें कीं इतर घरांपेक्षां आमच्याच घरांत तिचा दिवस-रात्रीचा वेळ अधिक जातो. आणि त्यानंतर या दोन वर्षांतल्या तिच्या चार बाळंतपणां-पैकीं चारहि आमच्या घरीं तिनें काढलीं तेव्हां मात्र मनाला वाटलें, कीं आमचेंच घर हें ती आपलेंसें मानते. अशी भावना दृढ झाल्यावर तिची काळजी आम्ही अधिक घेऊं लागलों यांत काय विशेष!

ही मांजरी प्रथम घरीं आली ती आम्ही चहा घेत बसलों आहों अशा वेळीं. सहजच मनांत आलें कीं तिलाहि दोन चमचे दूध घालावें. पण पूर्वपरिचय नाहीं म्हणून दूध डोळ्याला दिसलें तरी पुढें येण्याचें धैर्य तिला झालें नाहीं. हें जाणून आम्ही तिजकरितां तें दूध तसेंच ठेवून निघून गेलों. तेव्हां कोणी जवळ नाहीं असें पाहून तिनें त्याचा परामर्श घेतला. पुढें पुढें ती जेवण्याच्याहि वेळीं अशीच येऊं लागली. आणि आता तर असें झालें आहे कीं, चहाची जेवणाची वेळ लक्षांत ठेवल्याप्रमाणें ती अगदीं बिनचूक वेळेवर सैंपाकघरांत माजघरांत आमच्या आधीं तयार असते.

मांजर कुत्र्यापेक्षां अधिक स्वातंत्र्यप्रिय, आणि त्याचबरोबर तें अधिक अमर्याद असतें. कुत्र्याला तुम्ही एकदा मर्यादा घालून द्या कीं तें ती मर्यादा कधींहि उल्लंघावयाचें नाहीं. मीं एका घरीं असें पाहिलें आहे कीं, तशी मर्यादा घालून न दिल्यामुळें कुत्रें धन्याच्या बैठकीवर जाऊन बसेल, त्याच्या खुर्चीवर चढून बसेल, वेळीं अंथरुणावरहि बसेल. पण मर्यादा घालून दिल्यामुळें देवघर स्वयंपाकघराच्या उंबऱ्या-पलीकडे कधींहि जाणार नाहीं. आपणाला घालून दिलेली मर्यादा कुत्र्याच्या ध्यानांत चांगली राहते. स्वयंपाकघरांत खाण्यासारखे चमचमीत पदार्थ डोळ्यांसमोर तयार होत असतां त्याकडे लोभाच्या दृष्टीनें तें पाहत बसेल, आणि त्याच्याकरितां एखादा पदार्थ बाहेर आणून त्याला बोलावलें म्हणजे त्यावर उडी घालील. पण घरांत कोणी नसलें तरी दाखवून दिलेल्या मर्यादेपलीकडे जाणार नाहीं. उलट मांजराला मर्यादा म्हणून कशी ती माहीत नसते. तें जाणार

नाहीं अशी जागा नाहीं. हाकून घातल्याची लाज नाहीं. धाक दाखविल्यापुरतें पळून जाईल. पण फिरून पहिल्या जागीं तयार! शेवटीं धाक दाखविणाराच कंटाळतो. बरें धाक कायमचा लागेल इतकें त्याला मारवत नाहीं. मांजर मारल्याचें पाप फक्त काशीयात्रेनें धुतलें जातें ना! या सनातनी दयाबुद्धीचा फायदा घेऊन तें स्वयंपाकांतल्या पदार्थांना तोंड लावील. देवावरच्या अभिषेकाचें दूध चाटील. जेवणाराच्या पानांतहि तोंड घालण्याची त्याची तयारी.

मांजरांपैकीं बोक्याचें सांसारिक जीवनचरित्र कोणालाहि पाहावयाला सांपडत नाहीं, पण मांजरीचें पुष्कळच पाहावयास सापडतें. वर्षांतून तिचीं जितकीं बाळंतपणे व्हावयाचीं तितकेंच वेळां तिला विजातीय सहचराचा सहवास घडतो. त्या वेळीं तिच्या आवाजांत मृदुता येते व प्रेमकरुणाप्रेरित आलाप निघतात. हीच प्रेमयाचना असावी. याशिवाय आपल्या लहान पिलांशीं खेळतांना, इतर मांजरांशीं कलागत करितांना, पोरें पळवून नेण्यास आलेल्या बोक्याशीं युद्ध करितांना, खाण्याचा पदार्थ मागतांना, कोणी डोक्यावर हळुवार हात फिरवीत असतांना—ती आवाज स्वर काढते ते अगदीं वेगवेगळ्या प्रकारचे असतात.

'दारान् अपत्याय' हें वचन बोक्याला मुळींच लागू पडत नाहीं -हें मागें सांगितलें; पण 'पतिः अपत्याय' हें वचन मांजरीला पूर्णपणें लागतें. कारण नाइलाज म्हणूनच ती बोक्याची संगति प्रहरमात्र करिते. एरवीं घटस्फोट किंवा निदान कायदेशीर ताटातूट (लीगल सेपेरेशन) करून घेतलेल्या स्त्रीसारखें तिचें त्याच्याशीं वर्तन असतें. या स्वभावविशेषाला काय म्हणावें कळत नाहीं! कारण इतर शेंकडों पशुपक्षी कौटुंबिक जीवनाचे अभिलाषी दिसतात. यांत पक्ष्यांचा नंबर पहिला! कबूतरांचें प्रेम मनुष्यालाहि लाजवील. उलट सिंह व वाघ हे क्रूर प्राणी असले तरी ते गुहेंतून जोडप्यांनीं राहतात व शिकारीलाहि जोडीनें जातात. जोडप्याजोडप्यांनीं भक्ष्यशोधन करणाऱ्या पक्ष्यांत रेस्टोरॉंमध्यें जाणाऱ्या गुलहौशी तरुण-तरुणींचा संचार दिसतो! तसेंच

'हें पहा पक्ष्यांचें जोडपें— समुद्रकिनाऱ्यावर सहल करण्याकरितां निघालेली पतिपत्नीच' असें म्हणतां येतें. पक्ष्यांना प्रणयपत्रिका लिहितां येत नाहीं. पण ऋतुक्रमप्राप्त असे मंजुळ साद ते घालतात; किंवा पंखांची वेषभूषा सजवितात. तेव्हां त्यांच्यांत आणि तारुण्य-बाधित मानवी प्राण्यांत कांहींच फरक वाटत नाहीं. मांजराचेंच तेवढें तसें कां नसावें बरें?

कांहीं प्राण्यांना राहण्याला विशिष्ट प्रकारचें घर लागतें. तसें आयतें मिळेल तर ते त्यांत राहतात. इतर कांहीं स्वतःला हवें तसें घर स्वतः बांधून घेतात. यामुळें अशा प्राण्यांची वस्ती अमुक ठिकाणीं असावी असें अनुमानानें ठरवितां येतें. पण मांजरें कुठें 'राहतात' देवाला माहीत! त्यांच्यासारखें भुरटें उपरी जीवन इतर फार थोड्या प्राण्यांचें असेल! बेकार उडाणटप्पूंचा कायदा मांजरालाच खरा लागेल! त्याच्या हातून एकच गोष्ट मनुष्यहिताची घडते. ती म्हणजे उंदरांचा नाश, निदान उंदरांना धाक दहशत.

मीं १९०१ सालीं पहिल्यानें पुणें म्युनिसिपालिटीच्या मॅनेजिंग कमिटींत गेलों. तेव्हां वार्षिक अंदाज-पत्रक पुढें आलें त्यांत 'मांजरा-करितां दूध' या सदरांत कांहीं रक्कम घातलेली आढळली! मला तें कळेना. तेव्हां मला सांगण्यांत आलें कीं, दप्तरखान्यांत उंदीर होतात ते मारण्याकरितां मांजरें पाळण्यांत आलीं आहेत. पण मी मनांत म्हणालों, 'या पैशांचें दूध होत नसेल, व होत असलें तर तें शिपायाच्या घरीं जात असेल. बिचाऱ्या मांजरांवर उगीचच आळ! उंदीर कोठें सापडतात हें माजरांला कोणी शिकवावें लागत नाहीं. आणि मंजुरीच्या पैशानें दूध आणलें आहे आणि तें दूध मांजर पीत बसलें आहे याची मनानेंच नुसती कल्पना करावी झालें.'

मांजरीचें कौटुंबिक जीवन तिच्या बाळंतपणाचे वेळीं चांगलें पाहावयाला सापडतें. गर्भभारानें खिन्न झालेल्या मांजरीच्या तोंडावर काळजीची छटा येते. ती आळसावते आणि भक्ष्य-शोधनांतली तिची दक्षता कमी होते. तेव्हां मुद्दाम आपण होऊन तिला खाऊं घालावें

असें सहजच मनांत येतें. प्रसूतीच्या आधीं दोनतीन दिवस घरांतले कोनेकोपरे व आडोशाच्या जागा शोधण्याची तिची घालमेल लक्षांत आल्याशिवाय राहत नाहीं. म्हणून मनुष्याची दया पालवते, व तिच्या बाळंतपणाला निर्वेध जागा दाखविण्याची किंवा सोईची करून देण्याचीहि त्याला इच्छा होते. पण काय उपयोग? शिकविलें तरी न शिकण्यांत पहिला नंबर मांजरालाच मिळेल. आणि अखेर आश्चर्यकारक अशा जागीं व सामानसुमानांत ती प्रसूत झालेली आढळते. जवळ जाणाऱ्या प्रेक्षकाच्या तोंडाकडे ती अपमानास्पद रीतीनें पाहते. जणूं कांहीं त्याला म्हणते 'समजलें मीं. माझीं पिलें पळवून नेण्याचा तुझा विचार दिसतो. पण संभाळ.' हातांत दुधाची वाटीच दिसली तर निराळी गोष्ट !

एकदां माझ्या निजण्याच्या खोलींत उशाशीं असलेल्या कपाटामागें मांजरी सतत पंधरा दिवस पिलांना घेऊन राहिली होती. पिलांचा निर्वाह सर्वस्वीं तिच्या दुधावर होई. आणि त्यांना स्तनपान सोईचें पडावें म्हणून कुशीवर कलंडून पडलेली व तीं पीत असतां स्वतः डोळे मिटून शेपटी हलविणारी अशी ती पाहिली म्हणजे मला ती माणूसच वाटे. ठरल्या वेळीं ती बाहेर जाऊन मिळेल तें खाऊन व आपले देहधर्महि उरकून येई. या सबंध पंधरा दिवसात तिच्या जागेंत मला पिलांचीहि ओली कोरडी कोणतीच घाण दिसली नाहीं. यामुळें कल्पना झाली कीं, कवि मोरोपंतांनीं 'कथा सुरभि या' इ० केकेंत वर्णिलेलें 'स्ववत्समलभक्षण' हेंहि मांजरी खरोखरच करीत असावी.

हा निरुपद्रवीपणा टिकला तोंपर्यंत आम्ही तिला जागच्या जागीं मिळावें म्हणून दूध घालीत असूं. पण नंतर तिनें एकदां उंदीर मारून तोंडांत धरून पिलांना खाऊ म्हणून आणला तेव्हां मात्र मीं तिला हुसकून घालविलें.

प्रसूतीनंतर थोड्याच काळांत मांजरी आपल्या पिलांचा थारेपालट करूं लागते. याचें कारण त्यांना मारणाऱ्या बोक्याची भीति ! ती आपलीं पिलें कशी केव्हां हलविते तें कळूनहि येत नाहीं ! पण एखाद

वेळीं ती पिलूं तोंडांत धरून नेतांना दिसते तेव्हां तिच्या खऱ्या मायेची कल्पना येते. ‘खायचे दात वेगळे व दाखवायचे दात वेगळे’ अशी म्हण आहे. पण ‘भक्षणाचे दात वेगळे व रक्षणाचे वेगळे’ नसले तरी, एकाच दातांनीं मांजरी दोनहि कामें कशी करते तें पाहून कौतुक वाटतें.

मायेमुळें पिलांची चाळवाचाळव मांजरी करते खरी; पण त्यांतच धोका उत्पन्न होतो असें वाटतें. शिवाय माणसाच्या डोळ्यांसमोर ती आपलीं पिलें ठेवील किंवा त्याला ठेवूं देईल तर बोक्याचें भय कमी ठरेल. पण हें तिला समजावून कोण कसें सांगणार ?

कसेंहि असो, ‘संहार नसेल तर उत्पत्ति ही आपत्ति ठरेल’ ही म्हण इतर प्राण्यांप्रमाणें मांजरालाहि लागते. म्हणजे मांजरीला होणारीं सर्व पिलें जगतील, व फिरून तींहि त्याच प्रमाणांत प्रजोत्पत्ति करूं लागतील, तर मनुष्यांना घरें सोडून जावें लागेल. म्हणून ब्रह्मदेवा-इतकाच यम हा उपकारकर्ता म्हणावा लागतो. मात्र आपलीं पिलें नाहींशीं झाल्याचें पाहून चार दिवस मांजरी जें दुःख करिते तें पाहवत नाहीं. ती दिवसांतून चार चार वेळ सर्व जुने नवे कानेकोपरे व अडगळीच्या जागा शोधते हुंगते, आणि निराश होऊन क्षणभर शून्यवदन होऊन फारच करुणास्पद असे स्वर काढते.

या मांजरीची व माझी गट्टी अलीकडे फार जमली होती. पण ती फिसकटण्याला तीच कारण झाली. एकदां चुकून मीं तिच्या डोक्यावरून हात फिरविला व पायानें डोकें खाजविलें तें तिला बरें वाटलें. झालें ! मी असेन तेथें ती येऊन पायाशीं बसूं लागली व डोकें खाजवून घेऊं लागली. बागेंत घरांत फिरतांना पायांत लुडबडूं लागली. अनेक माणसें एकत्र बसलीं असतां इतरांना टाकून माझ्या पायाशीं पाटाशीं येऊन बसूं लागली. तात्पर्य, आपलेपणा दर्शविण्यांत ती माझ्यांत व इतरांत भेद करूं लागली. पण हें सर्व पारडें परवां अकस्मात् फिरलें. त्याचा प्रकार असा— मी खुर्चीवर बसल्या-बसल्या पायानें तिचें डोकें खाजवीत होतों. पण ‘आतां जा’ असें म्हणण्याकरितां

मीं पायानें तिला ढकललें. त्याबरोबर तिनें मला उजवा पंजा मारून पायाला ओरबाडून दोन ठिकाणीं रक्त काढलें. तेव्हां मला राग येऊन मीं एक हीरकाडी घेऊन तिच्या अंगावर मारली. तेव्हांपासून ती माझ्याकडे फिरकत नाहींशी झाली. पूर्वीं सैंपाकघरांत ताटापुढें काठी ठेवून तिला मधून मधून दवावी तो राग तिला खरा वाटत नसावा. पण परवां एकदांच तिला आपल्या हातानें छडी मारली तो राग खरा असें वाटून तिनें भीति घेतली असावी. मांजरीनें माझ्या पायाचें रक्त काढल्याचें आपण आतां विसरून जावें या विचारांत मी होतों. पण इतक्यांत तिच्या निर्दयपणाचा एक पुरावा दृष्टीस पडला. एक वाट चुकलेलें परक्या मांजराचें पिलूं कण्हतकुथत थबकत घरासमोरच्या रस्त्यावर कुंपणाशीं येऊन बसलें. शेजारचीं मुलें त्याच्या मागें लागलीं. त्यांना मीं दटावून दूर घालवून दिलें. पण लवकरच तीं सांगत आलीं कीं त्या पिलाचा प्राण मांजरानें घेतला. मला बोक्याचा संशय आला. म्हणून मीं मुद्दाम माडीवरून खालीं जाऊन पाहूं लागलों. त्या पोराच्या गळ्याशीं दातांनीं चावून नखांनीं ओरबडून खूप रक्त काढलें होतें. मीं म्हटलें ‘ अरे तुम्ही आसपास होता तर त्या बोक्याला दगड मारून घालवावें कीं नाहीं ? ’ तीं म्हणालीं, ‘ अहो, तो बोका नव्हता. आपल्या मांजरीनेंच तें परकें पोर मारलें, आम्ही जवळ जातों इतक्यांत. मला काय वाटलें तें काय सांगूं !

आधींच मला ळळा असा कमी. त्यांतून मांजरीचा हा घोर अपराध पाहिल्यावर यापुढें तिला आपल्या हातानें दूध कसा घालीन ? तिची मान कशी खाजवीन ?

पण तिनेंच शेवटीं माझ्यावर जय मिळविला. कारण फिरून ती मजकडे येऊं लागली. मान खाजवून घेऊं लागली. चहाचे वेळीं दुधाकरितां सत्याग्रह करूं लागली आणि तिचीं गेलीं दोन बाळंतपणें तर माझ्या लिहिण्याच्या टेबलाखालीं ठेवलेल्या रद्दी कागदांच्या करंडींत झालीं !

हा ळळा कसा तोडावा ?

---

## परभूमिका-प्रवेश ९

माझा स्नेही वसंतराव याची गाठ बरेच दिवसांत पडली नव्हती. म्हणून आज दुपारीं त्याच्या घराकडे मुद्दाम गेलों. तो घरांत आहे कीं नाहीं हें कळायला नेहमीं दोनतीन वेळां विजेची घंटा वाजवावी लागते व आंत जाऊन जिना चढावा लागतो. पण आज अंगणांत जातांच हसण्याचा मोठा आवाज दुरून कानीं पडला. त्यांत लहान मुलांचं खिदळणं तर होतंच पण मधून मधून वसंतरावाचा व त्याच्या बायकोचाहि आवाज ऐकूं येत होता.

मी खिडकींतून दिसतांच त्याच्या बायकोचा हसण्याचा आवाज एकदम थांबला. उलट ती रागानं बोलून मुलांना दटावूं लागली, 'हें काय! पुरे करा खेळ. बाहेर कोणी येतं सवरतं! तुम्हांला अगदींच कसं कळत नाहीं तें! दंगा दंगा म्हणजे किती! आणि खेळ झाला तरी त्याला कांहीं सीमा!'

हें बोलत असतांनाच तिनें मला कडी काढली. मी आंत जाऊन पाहतों तों वसंतराव ओणवा होऊन चतुष्पाद बनला आहे. त्याच्या पाठीवर त्याचीं दोन मुलें बसलीं आहेत. त्यांनीं हातांत खेळांतला चाबूक घेतला आहे. पायाच्या टाचांनीं तीं त्याला ढोशीत आहेत. आणि तोंडानं झ्या झ्या म्हणत आहेत.

मला पाहून वसंताची बायको लाजली. आणि तिच्यासमक्ष माझ्या दृष्टीस पडलेल्या या प्रकाराची संपादणी करण्याकरितांच कीं काय म्हणाली, 'भाऊजी, पाहिलात हा खेळ? मुलांची झाली म्हणून हौस पुरवायची तरी त्याला कांहीं सीमा! आतां तुम्हीच आलां होतां म्हणून ठीक—नाहीं तर—'

'नाहीं तर काय झालं असतं वहिनी?' मीं मुद्दाम होऊन विचारलं– थोडं कुत्सितपणानं.

'अगदीं ठाऊक नसल्यासारखंच बोलतां कीं भाऊजी! मला लाजेनं—' असं म्हणून वहिनीनं अशा सुंदर रीतीनं मान वेळली कीं कॅमेरा असता तर फोटोच घेतला असता!

'हो हो! अगदीं मरायला झालं असतं हिला बरं का माधव! तूं होतास म्हणून वांचली. काय करते आहे कांगावा!' असं बोलून वसंतानं अगदीं वर्म काढलं त्या बिचारीचं. पण आतां घोड्याचा खेळ थांबला.

मग मीं म्हणालों, 'वहिनी, तूं चुकते आहेस अगदीं. असा हा अपत्यप्रेमाचा सोहळा पाहायला मिळायचा तर भाग्य लागतं.' पण तिच्या स्त्रीसहज लाजेवर पांघरूण घालण्याच्या इच्छेनं मी आणखी पुढं म्हणालों, 'वहिनी, तूं नेपोलियन बोनापार्टाचं चरित्र वाचलं आहेस का कधीं?'

'हो. ठाण्याच्या विनायकराव भाव्यांनीं लिहिलेलं वाचलं आहे कीं.' ती किंचित् आठवण करून म्हणाली.

'मग त्यांत हें नाहीं का वाचायला मिळालं तुला, कीं एवढा जगत्जेता चक्रवर्ती बनलेला वीर नेपोलियन! पण आपल्या लहानग्या मुलाची हौस भागाविण्याकरितां, तोहि असाच घोडा होऊन त्या मुलाला पाठीवर घेऊन खेळत असतां, त्याला भेटायला एक परराष्ट्राचा वकील आला. तरी त्याच्यादेखत नेपोलियननं तो खेळ तसाच थोडा वेळ चालवून त्या वकिलाच्या नजरेला घातला म्हणे!'

'पण त्याची बायको तिथं असल्याचं लिहिलं आहे का त्या चरित्रांत, भाऊजी?'

'तें कां ? तीहि नसेल कशावरून तुझ्यासारखीच ? अशा खेळाला साक्षीदार प्रेक्षक हवाच. पण कदाचित् त्या परक्या वकिलाची वर्दी आल्यावर ती आंत निघून गेली असेल. पण मी कांहीं कोणी परकी नाहीं. म्हणूनच तूं निघून गेली नाहींस इतकंच.' मी वकिली थाटानं दुहजबी बोललों.

पण वसंताला राहवेना. त्याला बायकोची कुचेष्टा करायची होती पुरी. म्हणून तो म्हणाला, 'तरी पण तुझी चाहूल लागल्यावर हिनंहि नेपोलियनच्या बायकोसारखं निघून जायचं होतं ना ! पण तें नाहीं. तिनं तुला बाहेर थांबवून दुसऱ्या कोणाकडून कडी काढवायची तें न करतां, प्रतिष्ठितपणानं स्वतःच तुला कडी काढली. आणि तुला आंत घेतला. आणि मग तरी घरांत जायचं होतं ? पण अंहंः ! आणि आतां सांगतोंच तुला, माधव, मुलं स्वार होऊन माझ्या बरगडींत टाचा मारीत होती हें पाहून ही हसत होती. अन् मुलांच्या हातांत चाबूक कुणी आणून दिला ठाऊक आहे का ? विचार तिलाच.'

झालं. वहिनीचा कांगावखोरपणा पुरा बाहेर पडला. मी म्हणालों, 'मग यांत काय बिघडलं, वसंत ? तुझ्या कुशींत लाथा माराव्या, किंवा खेळांतल्या दोरीच्या चाबकानं तुला मारावं असं वहिनीच्या मनांत आलं—म्हणजे प्रेमाचा हा खेळ खेळावा अशी इच्छा तिला झाली— तर ती तिला स्वतः पुरी करितां आली असती काय ? ती आयती मुलांकडून भागविली जात होती. शत्रूला जो अपकार आपणा स्वतःला करतां येत नाहीं, तो दुसऱ्या कोणी केलेला पाहायला मिळाला तरी तितकंच सुख होतं माणसाला.'

वहिनींची लाज संभाळण्याच्या मिषानं प्रारंभ करून आतां तर तिच्या फजितीचा मीं कडेलोटच केला. तेव्हां ती खोटा फणकारा अंगीं आणून म्हणाली, 'तुम्ही पुरुष पुरुष एकमेकाला मिळालाच शेवटीं. मी तुमच्यावर विश्वासून इथं बोलत उभी राहिलें ही माझीच चूक.'

'बरं तर मग चहा आणून आपल्या चुकीचं प्रायश्चित्त घेऊन लवकर मोकळी हो कशी! चहा बरोबर केक खायला आणलीस, वहिनी, तर प्रायश्चित्त अधिक खसखशीत होईल. दानाइतकं प्रायश्चित्ताचं फल अधिक.'

पण तिला उठून घरांत जावं लागलंच नाहीं. मी आलेला पाहून स्वयंपाकीणबाईनं चहा ठेवलाच होता त्याचं तबक घेऊन तीच आली.

मग वहिनीसुद्धां आम्ही चहा घ्यायला बसल्यावर मी म्हणालों, 'खरंच सांग, वसंता, हा घोडा व्हायचा खेळ आज तूं केलास तो मुलांना सुचला, कीं तुला, कीं वहिनीला?' मीं तिच्याकडे पाहत भीत भीत हसत हसत विचारलं.

वसंता घाईनं म्हणाला, 'नाहीं, नाहीं. तिला हा खेळ सुचला असं मीं खोटं कसं सांगूं? खेळ सुरू झाल्यावर ती पाहत उभी राहिली आणि आमच्या आनंदांत तिनंहि भाग घेतला इतकं मात्र खरं.'

'बरं तर बरं, भाऊजी, मीं होऊन हा खेळ सुचविला नाहीं येवढं तरी खरं यांनीं सांगितलं हें माझं भाग्यच म्हणायचं हो!' पतिराजाच्या प्रामाणिकपणाबद्दल समाधान वाटलंसं दर्शवून ती म्हणाली.

'पण, वहिनी, फिर्यादीनं आरोपीवरचा एक मुद्दा आपण होऊन काढून घेतला म्हणून त्यामुळं इतर सगळे मुद्दे नाहींसे होत नाहींत कांहीं! तूं खेळ सुचवून सुरू केला नाहींस हें कबूल. पण तो तूं थांबविला नाहींस, उलट तो पाहत उभी राहिलीस, हें तर खरं ना?' मी न्यायाधीशाच्या ऐटीनं म्हणालों.

'अरे, तें तर झालंच. पण खेळांतला चाबूक माझ्या पाठीवरच्या स्वारांच्या हातांत कुणी दिला हें विचार तिला?' वसंत केकचा मोठासा तुकडा जोरानं तोंडीत एक आरोप मागं घेतल्याचा वचपा काढण्याच्या ईर्ष्येनं म्हणाला.

इथं मात्र वहिनीला नाकबूल जातां येईना. आपल्या बचावाकरितां गळापडू पद्धतीनं ती खूप मोठ्यानं हसूं लागली आणि म्हणाली,

'यांनाच घोडा घोडा करण्याचा खेळ सुचला तर मुलांना स्वार होऊन गंमत करावीसं वाटलं तर काय नवल? बरं, खेळाला प्रेक्षकांशिवाय कसा रंग येणार? त्यांत चाबूकच तेवढा कमी पडला, अन् मुलांनीं तो मागितला, म्हणून मी तो त्यांच्या हातीं दिला येवढं मात्र खरं. म्हटलं कुणाचा विरस कां करा?'

मग वसंतहि हसूं लागला. तो म्हणाला, 'आतां सांगतोंच तर माधव. खरं म्हटलं तर घोडा घोडा खेळण्याचं मीं मुद्दाम योजलं नव्हतं. पण त्याचं असं झालं, मी बब्याला मानेवर बसवून त्याचे दोन पाय दोहोंकडे खांद्याखालीं सोडून गमतीनं हिंडवीत होतों. थोड्या वेळानं तसाच खालीं बसलों व ओणवा होऊन बब्याला मानेवरनं गादीवर फेकून द्यावा असं मनांत आणलं. लगेच त्याला काय कसं आठवलं देव जाणे, तो मानेला चिकटला आणि झ्या झ्या म्हणूं लागला. जवळ बन्या होता. त्याला वाटलं हा घोड्याचा खेळ आम्हीं आरंभला. लगेच तोहि मागून पाठीवर चढून बसून झ्या झ्या करूं लागला. मग मलाहि वाटलं कीं पोरांना हा खेळ आवडतो आहे, तर खेळूं थोडा वेळ. मग खालीं गालिच्यावर मी चारी पायांवर चालूं लागलों आणि खेळ जोरांत सुरू झाला न् काय? क्षणभर मी घोडा असंच मला वाटलं; आणि तुला मौज सांगतों माधव—' आणि पुढचीं वाक्यं बोलतांना वसंताला हसं आवरेना कसं तें. 'तें घोड्याचं सोंग सजविण्याची बुद्धि मला होऊन मीं खिंकाळूं लागलों. बाजूला तोंड करून स्वारांच्या पायाला चावा घ्यायला सापडतो कां पाहूं लागलों. पोरांना काय? खेळ रंगेल तितका त्यांना हवाच होता. तीं हसूं खिदळूं लागलीं. इतक्यांत बाईसाहेब आल्या घरांतनं. त्याहि हसण्यांत सामील झाल्या, आणि पोरांनीं चाबूक मागितला तो त्यांनीं मुलांच्या हातांत दिला.'

'अस्सं.' तर मी म्हणालों, 'एकूण तुम्ही सर्वांनीं परभूमिका-प्रवेशाची हौस फेडून घेतली म्हणायची!'

'परभूमिका-प्रवेश ? मला वाटतं तुला परकायाप्रवेश असं म्हणायचं होतं. पण चुकून तोंडाला दुसराच शब्द आला असावा.' वसंत म्हणाला.

'होय, तो पहिला शब्दच माझ्या सवयीचा आहे खरा. पण मीं तो यापुढें टाकून देण्याचं ठरविलं आहे. शिवाय हा दुसरा 'भूमिका' शब्दच अधिक समर्पक आहे असं मला वाटतं.'

'तें कसं काय ?'

'तें असं. गेल्या वसंत व्याख्यान-मालेंत परकायाप्रवेश या शब्दाची एक दोघा प्रतिष्ठित साहित्यिकांनीं किती अप्रतिष्ठा केली, आणि त्याला असा अश्लील अर्थ जोडून दिला कीं, माझ्या मतें तर आतां तो शब्द कायमचा विटाळून राहिला. शिवाय नुसत्या कायेंत प्रवेश करून त्या मानसशास्त्रविषयक अनुभवाची पूर्तता होऊंच शकत नाहीं. योग-शास्त्रांतल्या परकायाप्रवेशांत काया दुसऱ्याची पण मन स्वतःचं असतं. पण दुसऱ्याच्या मनांतहि प्रवेश केल्याशिवाय कायाप्रवेशाचं स्वारस्य नाहीं. असं पाहा, या घोड्याच्या खेळांत प्रथम शरीर तुझंच होतं. तें खऱ्या घोडयाचं नव्हतं. नुसतीं मुलं तुझ्या पाठीवर बसलीं तर तुला आपण घोडा आहों असं वाटलं असतं का ? पण तूं जेव्हां घोड्याच्या मनांत प्रवेश केलास तेव्हांच तुला खिंकाळावंसं वाटलं. नुसतं शरीर खिंकाळत नाहीं. मन घोड्याच्या तोंडाकडून खिंकाळायला लावतं. भूमिका ही काया व मन दोन्ही मिळून होते, वसंत.'

'अस्सं ? पण तूं स्वतः असा भूमिकाप्रवेशाचा अनुभव घेतला होतास काय कधीं ?' वसंत म्हणाला.

मी म्हणालों, 'होय सांगतों ऐक—'

'चैत्री पौर्णिमेचं चांदणं. रात्रीं बाराची वेळ. गोड वाऱ्याची झुळूक येत होती. खंडाळा स्टेशनच्या उघड्या प्लॅटफॉर्मावर आमच्या गाडीचा रेल्वे गार्ड संथपणें इकडून तिकडे हिंडत होता. त्याच्या अंगावरच्या गणवेषावरून त्याचा अधिकार दिसून येतच होता. पण

नि. ६

त्याच्या उजव्या हातांतील तांबड्या हिरव्या रंगांच्या भिंगांचा कंदील हाच त्याचा अधिकार या वेळीं अधिक पटवी. तो तांबडी खूण देत आहे तोंपर्यंत गाडी हलेल? काय बिशाद! आणि हिरवी खूण दिली कीं, गाडीला हलण्याला परवानगी. नव्हे आज्ञा. वीस डब्यांची अजस्र गाडी आणि डोंगर ओढील येवढं प्रचंड इंजिन—पण सर्व कांहीं त्या गार्डाच्या वरच्या खिशाशीं लोंबणाऱ्या चिमुकल्या शिट्टीच्या आधीन! वाटलं काय हें सत्तावैभव!

'झोप आली नव्हती. ऐन घाटमाथ्यावर चांदण्यांत गाडी उभी. यामुळें सुंदर वनश्री पाहण्याकरितां आणि वाऱ्याची झुळूक सेवन करण्याकरितां मीं डब्याच्या खिडकींतून तोंड बाहेर काढलं.

प्लॅटफॉर्मावर या गार्डाशिवाय फारसं दुसरं कोणी नव्हतं. गाडी भरधाव चालूं लागेल तेव्हां दोन कोसांवर ऐकूं जाईल येवढा मोठा खडखडाट करील. पण आतां ती मारकट बापानं दटावलेल्या लहान मुलासारखी अगदीं निश्चल गुपचूप! दूरच्या रातकिडयांची किरकीर कानांला स्पष्ट ऐकूं येते इतकी शांतता.

'आणि सांगूं का, तुला जसं घोडा व्हावंसं वाटलं तसंच मला त्या वेळीं खरोखरच क्षणभर इच्छा झाली कीं, आपण रेल्वेचा गार्ड व्हावं! मग मनानं परभूमिकेंत प्रवेश करण्याला काय उशीर? लगेच मीं गार्ड बनलों. मला वाटलं कीं माझ्या हातांत तांबडया हिरव्या काचेचा कंदील आला. गणवेषाच्या खिशांत शिट्टी आली. आणि वाटूं लागलं, कीं आतां गाडी सुटणं न सुटणं हें माझ्या हातीं आलं. म्हणून, प्लॅटफॉर्मावर चांदण्यांत ऐटीनं हिंडण्याचं सुख आणखी थोडं भोगावं असं वाटल्यावरून, मी काल्पनिक कंदिलाची काच फिरविली नाहीं व शिट्टी काढून वाजविली नाहीं. आणि तो खरा गार्डहि खालीं मान घालून हिंडत होता.

'पण गाडीची खरी वेळ होऊन गेली. लाइन क्लिअर सिग्नल देऊन झाला तरी गाडी सुटेना. असं दिसतांच स्टेशनमास्तर माझ्या

डब्याशीं उभा होता तो चुळबुळ करूं लागला. तेव्हां त्याच्यांत व अंडरगार्डांत झालेलं संभाषण माझ्या कानांवर पडलं तें असं :—

‘काय रे, आज तुझा गार्ड दारूबिरू प्याला आहे कीं काय? अजून शिट्टी वाजवीत नाहीं तो?’

‘दारू नाहीं प्याला. पण उद्यांच्या काळजींत आहे.’

‘तें कशाबद्दल?’ मास्तर आश्चर्यानं म्हणाला.

‘परवां घाटांत चांदीच्या पार्सलाची चोरी झाली नाहीं का? त्याची फिर्याद झाली आहे. या गार्डावर पक्का अंदेशा आलेला आहे त्यांत सामील असल्याचा. बातमी आली आहे कीं सकाळीं गाडी बोरीबंदरांत पोंचतांच या स्वारीच्या हातांत पोलीस हातकड्या घालणार. त्या काळजींत आहे तो. मग काळजी घालविण्याकरितां दारू प्याला असला तर कुणाला ठाऊक?’

‘एकदम माझ्या मनाला धक्का बसला. एकूण हा गार्ड खालीं मान घालून चालतो आहे, तो अधिकाराच्या ऐटीनं नव्हे, तर खटल्याच्या काळजींत! त्याच्या मनांत प्रवेश केल्याबरोबर शरीरांत प्रवेश करून राहण्याची माझी इच्छा परतली. त्याची मनोभूमिका स्वीकारून प्लॅटफॉर्मवरून चांदण्यांत एक फेरी मारली, पुरे झाली. त्याच्यापुढं वाढून ठेवलेला खटला, शिक्षा, कैद, बडतर्फी, बेकारी, या काय सुखाच्या गोष्टी म्हणून मन त्यांत रमेल? सुदैवानं परभूमिका-प्रवेश करून हवं तेव्हां मन परत येतं म्हणून बरं कीं! नाहीं तर त्या गार्डाच्या पुढील विवंचनाहि मनानं मला सोसाव्या लागायच्या. थोडी तेवढी गोडी. पतंग सगळ्या बागेवर भ्रमण करितो, पण तो एखादंच फूल निवडून त्यावर बसून त्याचा रस चाखतो. आणि फुलावर बसतो तो तरी किती अगदीं क्षणभर! भ्रमर हेंहि चंचलतेचं उपमान असतं. पण त्याला उपमान बनविणारे कविच त्याचं वर्णन असं करितात कीं, तो कमलमधु पिण्यांत गुंग झाला तर सूर्यास्त होऊन त्याला कमलकोशांत अडकून पडावं लागतं. बरं झालं, माझं मन लवकरच परभूमिकाप्रवेश संपवून परत आलं.’

वसंत म्हणाला, ‘बरं झालं, माधव, तूं येऊन लवकरच माझा घोड्याचा खेळ थांबवून मला परभूमिकेंतून परत पाठविलंस. नाहीं तर मला कुशींत टांचांचा मार आणि पाठीवर चाबकाचे फटके आणखी खावे लागले असते.’

‘पण, बाबा, ते आवडत्या मुलांचे ना?’ मी म्हणालों.

वहिनीच्या मनांत कदाचित् म्हणायचं आलंहि असावं ‘पण ते माझे तर नव्हेत ना?’ पण ती नुसती हसत हसत घरांत निघून गेली.



## वेळ चोराल ! पण काळ—? १०

अवसेच्या रात्रीं दहाच्या ठोक्याबरोबर मी अंथरुणावर लवंडून अंगावर शालजोडी ओढून घेतों. आणि पहाटे पांचाच्या ठोक्याबरोबर अंगावरची शाल काढून टाकून उठून बसतों. झोप सरल्याची जांभई देतों. हा माझा सर्वसाधारण पण न चुकणारा असा कार्यक्रम आहे. काल ता. ३१ ऑगस्ट रोजीं दहाचे ठोके ऐकून मी अंथरुणावर लवंडलों. आणि आज ता. १ सप्टेंबर रोजीं पहाटे पांचाचे ठोके ऐकून अंथरुणावर उठून बसलों. हें रोजच्याप्रमाणं झालं खरं. पण आज रोजच्याप्रमाणं माझ्या तोंडीं रामनाम यायचं त्याऐवजीं शिवी आली ! मी रागावून घड्याळाला म्हणालों, 'गद्धा, बेवकूब, आज वेळ एक तास आपोआप पुढं जायची आहे ना ! सरकारच्या हुकुमाप्रमाणं आतां सहाचे ठोके पडायला पाहिजेत तें तूं आपले पांचाचेच पाडलेस!'

हें ऐकून घड्याळालाहि राग आला. हो, अन्यायानं शिवी दिली तर मुका नोकरहि बोलका होतो.

घड्याळ म्हणालं, 'हां ! संभाळून बोला धनी. गद्धा, बेवकूब कुणाला म्हणतां ? मीं एका मिनिटाचीहि अफरातफर केली नाहीं. रात्रीच्या दहापासून आतां पहाटच्या पांचपर्यंत अगदीं ठराविकपणानं,

दर साठ सेकंडांनंतर एक मिनिट, आणि दर साठ मिनिटांनंतर एक तास, याप्रमाणं काटे पुढं सरकवून मधून मधून तासाचे ठोके बरोबर देत होतों. मला काय माहीत कीं तुम्हांला आजच पांचाऐवजीं सहावर 'अवर काटा' दिसायची आणि पांचाऐवजीं सहा ठोके ऐकायची लहर लागली आहे म्हणून ?'

आपला गरीब नोकर थोडा आवाज चढवून बोलला म्हणजे शहाणा धनी मनांत समजतोच कीं, 'अरे हो! बेटं, आपलंच कांहीं तरी चुकलं असेल बरं का ?' तसंच मला वाटून मी माझा आवाज थोडा उतरवून घड्याळाला म्हणालों, 'अरे, पण आमच्या वरिष्ठ सरकारानं तसं ठरविलं आहे ना ?'

घड्याळ म्हणालं, 'साहेब, तुम्ही मनांतनं आपल्या वरिष्ठ सरकार-ला कितपत राजनिष्ठ आहां हें माहीत आहे मला. पण माझे वरिष्ठ सरकार तुम्ही. मी मात्र असा तोंडदेखला राजनिष्ठ नाहीं. मनांत सरकारला शिव्या द्यायच्या, आणि हातानं त्याचे हुकूम पाळून अमलांत आणायचे. तुम्हांला अन्यायानं एक तास वेळेचा अपहार करायचाच होता तर हवे तसे आपल्या हातानं कांटे फिरवायचे होते. त्याला माझी तक्रार का आहे ? आणि ते तसे फिरवलेत म्हणजे मग तिथून पुढं मी एक मिनिट तरी चुकतों का बघा !'

तेव्हां माझी चूक मला कळून आली. वेळ एक तास आपोआप पुढं जायचा तर, रात्रीं बारा वाजतां मी जागा होऊन आपल्या हातानं बारावरचा काटा एकावर नेऊन ठेवायला पाहिजे होता. तें मीं केलं नाहीं. मीं तणावून झोप काढली. आणि जागं राहून आपलं काम बिनचूक करीत असणाऱ्या घड्याळाला मात्र नांवं ठेवलीं. मग खरा गद्धा आणि बेवकूब कोण ? घड्याळ कीं मी ?

पण मग वाटूं लागलं कीं आपणाला कोणी जोडीदार गद्धा बेवकूब मिळाला तर पाहावा. आपल्या एकट्याचेच कान लांब झालेले कुणाला पाहवत नाहींत. म्हणून विचार करूं लागलों तेव्हां लक्षांत आलं कीं, मुळांत गाढवपणा झाला आहे तो आपण आपलं स्वातंत्र्य

घालवून बसलों तेव्हांच झाला. म्हणूनच विलायतेंतल्या ग्रीनविचच्या अक्षांश रेखांशाशीं हिंदुस्थानांतल्या वेलामापनाचा शरीरसंबंध घडला. तात्पर्य, तें आमचं हिंदी स्वातंत्र्य घालविणाऱ्या लोकांनींच तो गाढवपणा केला ! '

पण लगेच मनांत आलं कीं ' अरे, पण ते लोक आपलेच पूर्वज ! म्हणजे पर्यायानं आपणच त्यांच्या रूपानं नव्हतों का तेव्हां ? बरं त्यांनीं स्वातंत्र्य घालवून विलायती स्थायी कालमापनावर हिंदी कालमापन येऊन बसूं देण्याची चूक केली, तर ती सुधारण्याला तरी आमचं आम्हीं काय केलं आहे ? का स्वातंत्र्य परत मिळविलं आहे ! का त्याहून साधी सोपी गोष्ट एक तास घड्याळ पुढं सरकविण्याच्या कायद्याचा ' विनयभंग ' केला आहे ?

तो मुंबईकर फेरोजशहा मेथा बहाद्दर खरा. त्यानं मुंबई म्युनिसिपालिटींत आपली सत्ता चालवून क्राफर्ड मार्केटचं घड्याळ स्थानिक मुंबई टाइमवर आणून ठेवलं. सरकारी युनिव्हर्सिटीच्या घड्याळांत, हायकोर्टाच्या घड्याळांत, दुपारचे अकरा वाजतात, तर पांच दहा मिनिटांच्या अंतरावर असलेल्या मार्केटाच्या घड्याळांत सव्वा दहाच ! तब्बल चाळीस मिनिटांचं अंतर ! म्हणजे हायकोर्टाजवळून अकरा वाजतां चालत निघालेला मनुष्य मार्केटाशीं आला तर ( त्यानें इतकी दहा मिनिटांची वाटचाल करूनहि ) घड्याळांत दहा पंचवीसच ! खुशाल तीस मिनिटं चोरून विश्रांत घालायला मिळालीं ! म्हणजे एच्. जी. वेल्स यानं आपल्या एका कादंबरींत वर्णिलेल्या काल्पनिक ' वेलायंत्रा 'वर ( टाइम मशीनवर ) बसून वेळेच्या मागं जाण्याचा अनुभव मिळाला म्हणायचा !

या ठिकाणीं श्री. कृ. कोल्हटकरांनीं मिलाला लिहिलेल्या एका पत्राची मला आठवण होते. त्याचा प्रसंग असा. या मित्रानं आपल्या घरच्या एका लग्न-समारंभाचीं छापील निमंत्रणं बाहेरगांवच्या स्नेह्यांनाहि पाठविलीं. असलीं निमत्रणं पुष्कळशीं औपचारिकच असतात. ' सह-

कुटुंब सहपरिवार येऊन कार्यसिद्धि करावी' असं त्या पत्रांत लिहिलेलं असतं. पण 'सहपरिवार या' हें आमंत्रण मूर्खपणानं खरं समजून जर समजा, कोणी मित्र लग्नाला दहावीस माणसं घेऊन गेला, तर हें भरताडी वऱ्हाड घरीं आलेलं पाहून निमंत्रण पाठविणाराला बरं वाटेल कीं तो मनांत शिव्या देईल ? पण औपचारिकपणाचा दुसरा एक हास्यास्पद प्रकार सहज असा होतो, कीं लग्नाच्या तिथीनंतर दुसऱ्या दिवशींहि आमंत्रण हातीं पडतं. कोल्हटकरांनीं अशा एका निमंत्रणाला खालील उत्तर पाठविलं. 'आपलं निमंत्रण पोंचलं, त्याबद्दल आभारी आहें. त्याप्रमाणं येण्याचं मनांत होतंहि. आणि ता. १२ डिसेंबरला होणाऱ्या लग्नाचं आमंत्रण ता. १३ ला हातीं पडून, दोनशें मैलांचा प्रवास करून ता. १२ ला पुण्यास उपस्थित राहतां आलं असतं तर मला फार आनंद झाला असता. पण एच्.जी. वेल्सचं 'टाइम मशीन' मजजवळ नव्हतं. म्हणून अनुपस्थितीबद्दल क्षमा करा.' पण मुंबईत मात्र हें वेळेनंतर निघून वेळेआधीं जाणं शक्य आहे खरं.

फेरोजशहा मेथावर कोणी आक्षेप असा घेत कीं, तो आळशी होता. अकरा वाजतां हायकोर्टांत जावयाचं तर त्याला, मधला सर्व कार्यक्रम पुरा करण्याकरितां, सूर्योदयाच्या आधीं पाऊण तास उठून साखरझोप मोडावी लागे. म्हणून त्यानं मुंबई शहरांत, खुद्द मुंबई शहरीं अनुभवाला येणारीच, प्रत्यक्ष कालगणना चालू राहावी असा आग्रह धरला होता. आणि सर्व हिंदुस्थानभर पसरून राहिलेल्या आगगाडीचा संबंध सोडला तर, मुंबई शहरांतले इतर सर्व व्यवहार 'मुंबई टाइम'प्रमाणें चालण्यास कांहीं हरकत नव्हती व नाहीं. पण म्युनिसिपालिटीच्या घड्याळावर जी सत्ता फेरोजशहांना होती ती त्यांना हायकोर्टांतील घड्याळावर नसल्यानं, त्यांनाहि हायकोर्टांत हायकोर्टांतल्या घड्याळाच्या अकरा वाजतांच दाखल व्हावं लागे. मग ते पाऊण तास आधीं झोपून उठत, कीं सकाळच्या इतर कामांचा वेळ यथाप्रमाण कमी करीत, माहीत नाहीं. आणि आतां तर अधिकच गंमत होणार !

कारण मार्केटच्या घड्याळांत बारा वाजतील तेव्हां शेजारच्या सरदार-गृहांत पावणेदोन वाजणार !

पण करणार काय ? जगाच्या यंत्रांत सापडलेल्या माणसाची अशीच दुर्दशा होते आहे. कारण रशियांत स्टालिनग्राडशीं युद्ध चालू आहे म्हणून पुण्यांतल्या हमालीण पाटीवालीला रात्रीं दिवा लावण्याच्या रॉकेलचा तुटवडा !

खरं बोलायचं म्हणजे वेळ व कामकाज यांचा मेळ घालायचा तर साधेल तितकी अधिकांत अधिक 'लोकल टाइम' हीच योग्य. सूर्याच्या अस्तोदयानंच जगांतलं सर्व कार्य नियमित झालं पाहिजे. आणि मनुष्येतर सर्व प्राणी या नियमाला अनुसरूनच वागतात. तुमचीं घड्याळं तुम्ही कितीहि हातानं मागं पुढं करा. पण कोंबडा पाटीखालीं झाकून ठेवला असला तरी तो सूर्योदयापूर्वीं जितका वेळ आधीं आरवायचा तितकाच वेळ आधीं आरवल्याशिवाय राहायचा नाहीं. इतर म्हणजे आभाळांत उंच उडणाऱ्या पक्ष्यांची हीच गोष्ट आहे. कोंकणांतल्या माझ्या एका मुक्कामांत मीं घड्याळ नेलं नव्हतं. तेव्हां कोंबडा आरवला कीं पांच वाजले म्हणून मी उठे. आणि सामगायनाप्रमाणं आवाज काढणारा तो पक्षी—काय बरं त्याचं नांव—ओरडला, कीं सहा वाजले असं समज. मध्यरात्रीचे बारा केव्हां वाजले हें कळण्याचं कारण नसतं म्हणा. पण एखाद वेळीं घुबडाचा शब्द कानांवर आला म्हणजे मी म्हणे, 'हं, आतां बारा वाजले बरं का.'

आणि सूर्योदय सूर्यास्त यावर दिनमान, कालगणना व कार्यक्रम आखून ठेवण्यासारखा शास्त्रशुद्ध दुसरा कोणताहि नियम नाहीं. शाकुंतल नाटकांतला ऋषि-शिष्य म्हणतोच—

तेजोद्वयस्य युगपद् व्यसनोदयाभ्यां
लोको नियम्यत इवात्मद शान्तरेषु।

यांतील म्हणजे 'तेजोद्वय' सूर्यचंद्र. शिवाय सूर्य व चंद्र दोनहि दिसत नाहींत तेव्हां नक्षत्रें आहेतच ना ! समुद्रावर फिरणाऱ्या नाविकांना नक्षत्रांचंच मुख्य सहाय होतं. आतां अस्तोदयाच्या दरम्यान विभाग

गणनेला कांहीं साधन लागणारच. त्यापुरतं घड्याळ ठेवावं. त्या घड्याळाऐवजीं जुन्या काळीं आपले लोक घटिकायंत्र वापरीत. सकाळीं हातावरची लव दिसूं लागली म्हणजे दिनारंभ समजून घटिपात्र पाण्यांत घालायचं. आणि घटका पुरी भरून तें बुडलं म्हणजे वर काढून रिकामं करून पुन्हा भरत लावायचं. पण हें काम एकंदरींत कंटाळ-वाणंच होत असेल. आणि त्यांत धोका हा कीं, घटका भरून बुडतांना दुर्लक्ष झालं कीं, कांहीं पळं गणितांतून जायचीं.

घटका व घडयाळ यांच्या भांडणाची एक गोष्ट सांगतात. घडयाळ म्हणतं, 'घटका पाणी पिते आणि घडयाळ (दांडक्यानं वाज-विण्याचा पितळी पत्रा) टोले खातं.' पण घडयाळाला हें माहीत नसावं कीं, कित्येक वेळां घटका पाणी पितां पितां तें तिला अनिच्छेनं इतकं प्यावं लागतं कीं, पोट फुगून तिला जलसमाधि मिळते. ती घंगाळांत बुडते. उपाध्येबुवांचा बटु इतर दोन कामं उरकून, दक्षणा कनवटीला लावून परत येऊन, घटकेला घंगाळांतनं वर काढतो तेव्हां तिचा प्राण फिरून सुरू होतो. आणि वेळ चुकल्यामुळं धर्माचारांत त्यापुढचं कृत्य अपकृत्य झालं त्याचं पाप यजमानाला लागतं. त्यापेक्षां आपलं कमानीचं घडयाळ बरं. एकदा किल्ली दिली आणि लावून ठेवलं कीं, आंतील कमान असेल त्याप्रमाणं, एक दिवस किंवा आठ दिवस पाहायला नको. नुसते डोळ्यानं तास पाहावे. या दृष्टीनं (पण रात्र लक्षांत न घेतां) 'सन् डायल' फार चांगलं. सर्व दिवसभर ऊन पडेल अशा ठिकाणीं ठेवलेल्या एका दगडावर वर्तुळ काढून, हवे तितके आंकडे मांडून, मध्य बिंदूवर काडी उभी करून ठेवली, कीं बिचारा बिनपगारी सूर्य अदमासी वेळ सांगतो तुम्हांला.

पण इतकं करूनहि सन् डायल, छायायंत्र, घटियंत्र, घडयाळ यांपैकीं कांहीं लावून अगदीं बिनचूक कालगणना झाली तरी एक राहतंच! वेळ तितकाच; पण तोच माणसाच्या मनःस्थितीप्रमाणं उशीरा किंवा लवकर गेल्यासारखा वाटतो, हें व्यस्त प्रमाण कोण सुधारणार? या मनःस्थितीच्या घडयाळावर नुसत्या दिवसाचं नव्हे तर ऋतूंचंहि मान

बदलतं कीं ! नाहीं, सूर्यचंद्राचे गुणहि बदलतात. " सविता विधवति विधुरपि सवितरति तथा दिनंति यामिन्यः । यामिनियंति दिनानि सुखदुःख वशीकृते जंतौ (मनसि) " हाच श्लोक घ्या. माणसाचं मन सुखी अगर दुःखी असेल त्याप्रमाणं सूर्याचं ऊन थंड वाटतं आणि चंद्राचं चांदणं ऊन चटके देत'. शेक्सपिअरचं 'रिचर्ड दि थर्ड' हें नाटक कॉलेजांत वाचलं होतं त्यातलं एक वाक्य असं आठवतं, 'Now is the winter of our discontent made glorious summer by this sun of York'. शेक्सपिअरनं As You Like It या आपल्या नाटकांत वेळ त्याच मापानं मोजतात पण कुणाला तो लवकर जातो, कुणाला हळू जातो याचं मोठं गमतीदार वर्णन एका पात्राच्या तोंडून केलं आहे त्याचीही आठवण झाली.

'वेळ हा चौखूर उधळणाऱ्या घोड्यासारखा जातो. पण कुणाला ?—तर फासावर लटकविण्याकरितां नेण्यांत येणाऱ्या दरोडे-खोराला. वेळ हा दुडक्यासारख्या उड्या मारीत जाणाऱ्या घोड्या-सारखा जातो. पण कुणाला ?—तर लग्न ठरलं आहे, पण बोहलं घालायचं आहे, या दरम्यानच्या स्थितींतील वधूला. वेळ हा ऐटबाज पावलं टाकीत जाणाऱ्या घोड्यासारखा जातो. पण कुणाला ?—तर संस्कृताचं ज्ञान नसलेल्या पुराणिकाला किंवा संधिवात नसलेल्या श्रीमंताला ! आणि वेळ सरतां सरतच नाहीं, ठाणबंद घोड्यासारखा उभाच राहतो, जातच नाहीं.—पण कुणाला ? तर मे महिन्याची सुट्टी घालविणाऱ्या वकिलाला ! या सर्व कोट्यांचा खुलासा करायचा तर विस्तार होईल म्हणून तें सोडून देतों. पण एकंदरीनं मुद्दा हा कीं, कालगणनेचं शास्त्र मोठं अवघड आहे. भूक लागली म्हणजे जेवण्याची वेळ झाली, जांभया येऊं लागल्या म्हणजे झोपण्याची वेळ झाली; अशा पद्धतीनं ज्यांना कालमापन करतां येतं, आणि त्या कालमानाप्रमाणं क्रिया करतां येतात, तेच सुखी नव्हेत काय ?

हल्लीं सरकारानं एक तास खाल्ला त्याचा जमाखर्च सरकारी वहींत कसा होणार याची कल्पना करतां येत नाहीं. पण समाजाच्या सोई-

करितां तासच काय अनेक दिवस खाल्ल्याचे गुन्हे पूर्वी घडलेच आहेत. युरोपांत पूर्वी एकदां पंचांग ठाकठीक करण्याकरितां चौदा दिवस सरकारानं व धर्माधिकाऱ्यांनीं संगनमत करून खाल्ले, तेव्हां लोकांनीं 'Give us back our fourteen days' अशी ओरड व चळवळ केली. फक्त अशी चळवळ करीत नाहींत कोण? तर वेळेचा ताळतंत्र न संभाळणाऱ्या, अवक्तशीरपणाची लाज न वाटणाऱ्या, कांहीं कांहीं मासिकांचे बिचारे वाचक. जानेवारीच्या अंकानंतर ऑक्टोबरचा अंक काढून, फिरून जानेवारीचा अंक तोच सप्टेंबरचा समजा असं वर्गणीदारांना सांगणारे संपादक आढळतातच कीं! पण काळाचे तुकडे तोडून चोरून खाणाऱ्या राजांना, धर्माध्यक्षांना, सरकारांना, संपादकांना काळ हसून म्हणत असेल, 'बेट्यांनो, तुम्ही अशा चोऱ्या करून माझं कितीसं खाल? मी सर्वांचा भक्षक बसलों आहे ना! संभाळा. माझ्या घड्याळाची किल्ली अशी एकदांच देऊन ठेवली आहे, कीं ती कधीं संपायचीच नाहीं. आणि माझ्या तबकडी-वरील कांट्यांना कुणीहि हात लावून ते हवे तसे फिरवितां येणार नाहींत!'

---

# आहे ? आहे ! नाहीं ? नाहीं !  ११

माझ्या वडिलांचें एक आवडतें भजनी पद असे. तें नेहमीं त्यांच्या तोंडीं येई. आणि व्यवहारांतल्या पुष्कळ प्रसंगीं तें ते हेतुपुरःसर म्हणून दाखवून वाद तोडीत. त्यांतला मला आठवतो तो भाग असा :—

होतां गुरुकृपा वरदान । प्राप्त झालें ब्रह्मज्ञान
तेथें संसाराचें काम । आहे आहे नाहीं नाहीं ॥
सुटली संसाराची झेल । भक्ती वाढलासे वेल
संध्याकाळीं दिव्यांत तेल । आहे आहे नाहीं नाहीं ॥
पोटीं लागलीसे भूक । न म्हणे शिळें आणि साजूक
तेथें पुरणपोळी नाजूक । आहे आहे नाहीं नाहीं ॥
कोऱ्या घोंगडीचें चीट । भिक्षेचें तें मुठभर पीठ,
तेथें भाकरीसी मीठ । आहे आहे नाहीं नाहीं ॥
सेवितां सद्‌गुरुचें कूळ । ब्रह्म त्रैलोक्य गोकूळ
तेथें दारापुत्र अनुकूळ । आहे आहे नाहीं नाहीं ॥
अंतरीं होउनी निष्काम । मुखीं आलें हरिचें नाम
तेथें संसाराचें काम । आहे आहे नाहीं नाहीं ॥
अमृतराय बोले परमार्थ । न करी कोणासी वादार्थ
समयीं लागला पदार्थ । आहे आहे नाहीं नाहीं ॥

या वेदांती पदांचें मर्म न कळण्याइतका लहान, पण 'आहे' व 'नाहीं' यांतील विरोधी अर्थ कळण्याइतका मोठा, लहानपणीं असतां, मी वडिलांना म्हणे 'हें काय हो दादा! आहे आणि नाहीं हीं दोनहि एकदम कशीं? आणि आहे व नाहीं हें एकत्र म्हणणें ही जर एकपट चूक, तर 'आहे आहे नाहीं नाहीं' ही दुप्पट चूक होते?'

ते उत्तर देत 'मोठा हो म्हणजे कळेल.'

पुढें मोठा झाल्यावर, म्हणजे कॉलेजांत जाऊन काव्यविडंबन 'यथामति यथाशक्ति' करतां येऊं लागल्यावर, मी कांहीं कडवीं रचून या पदाला तीं जोडून थट्टेनें म्हणूं लागलों:

कप्तानें मारियला टोला चेंडू तंबूवरती पडला
मग जाग्यावर फील्डरऽभला आहे आहे नाहीं नाहीं
टर्म-दिवस शेवटचा आला वर्गामध्यें गोपाळकाला
मग प्रोफेसर खुर्चित बसला आहे आहे नाहीं नाहीं
आइसक्रीमनें पेला भरला फ्रेंच सेंटचा वास लागला
मग चमचा तें सेवायाला आहे आहे नाहीं नाहीं

'आहे? आहे! नाहीं? नाहीं!' हे दिसण्यांत चार शब्द. पण खरे दोनच. एक 'आहे' व दुसरा 'नाहीं'. किती साधे सोपे शब्द! याहून अधिक सोपे मूलभूत शब्द साऱ्या मराठी भाषेंत दुसरे आहेत काय? पण या अवघ्या दोन शब्दांच्या द्विरुक्तीनें त्या शब्दांत साठविलेलें मर्म व तत्त्वज्ञान किती विशाल आहे? मात्र तें तसें प्रतीत होण्याला लेखन, छपाई, ह्यांच्या तंत्राचें साहाय्य घेतल्याशिवाय भागत नाहीं. आणि तें घेतल्यास ते चार शब्द वर मथळ्यांत लिहिल्याप्रमाणें लिहावे छापावे लागतील. पहिल्या आहे पुढें प्रश्नचिन्ह, दुसऱ्या आहे पुढें उद्गारचिन्ह. पहिल्या नाहीं पुढें प्रश्नचिन्ह दुसऱ्या नाहीं पुढें उद्गारचिन्ह.

पण तेवढ्यानेंहि खरोखर भागत नाहीं. कारण शाळकरी मुलाच्या हातांत हे शब्द देऊन ते वाचावयास सांगितले तर, त्याला विरामचिन्हें कळत असलीं तरी, त्यांतील मर्म किंवा तत्त्वज्ञान प्रकट करतां

येण्यासारखे ते त्याला वाचतां येणारच नाहींत. त्याचा त्यालाच जर शब्दांच्या त्या जोड्यांचा अर्थ कळण्याचा संभव नाहीं, तर दुसऱ्याला तें मर्म समजावून देण्यासारखें त्याला कसे वाचून दाखवितां येतील ?

मग तुम्ही आणखी मदत तरी कुणाची घेणार ? होय, एकादा मनाजोगा उत्कृष्ट नट जर गाठून द्याल तर त्याला, भुवया आखडून व विस्तारून, डोळ्यांत तेज आणवून व घालवून, आवाज चढवून व उतरून, आणि हात हवे तसे वर खालीं करून किंवा आडवे पसरून, त्याला त्या शब्दांचें मर्म प्रकट करतां येईल.

आणि हें खरेंच आहे कीं, गाण्यांत जशीं अक्षरें थोडीं आणि आलापाला जागा पुष्कळ अशी सोय तें रचणारानें केली तरच गवयाला तें चांगलें गाऊन दाखवितां येतें, त्याप्रमाणें नटाकडून भावनेचा परिणामकारक आविष्कार व्हावयाचा तर त्याला बोलण्याचे शब्द जितके सोपे लहान व थोडे असतील तितके चांगले.

पण अशा नटालाहि आहे ? आहे ! नाहीं ? नाहीं ! या चार शब्दां-मध्यें साठविलेलें तत्त्वज्ञान प्रकट करण्यासारखे ते शब्द उच्चारावयाचे तर तें तत्त्वज्ञान आधीं त्याच्या मनांत भरवून दिलें पाहिजे तरच तो आविष्कार वठेल. नाहीं तर निष्णात नटहि शाळकरी मुलासारखाच ठरेल.

मग ह्या चार शब्दांत साठविलेलें तत्त्वज्ञान तरी काय आहे ? मला वाटतें 'अनासक्ति योग' ह्या एका शब्दानें तें तत्त्वज्ञान नामांकित करितां येईल. अनासक्ति हा आसक्ति व संन्यास ह्यांतला मध्यमक्रम आहे. आसक्ति म्हणजे नुसती सुखाची इच्छा इतकेंच नव्हे, तर तें सुख मिळविण्याचा हव्यास, तें मिळाल्यास त्याचें अतिरिक्त सेवन, तेवढ्यानेंहि अतृप्त राहून तें आणखी मिळविण्याची हाव, आणि तें न मिळालें तर खेद व दुःख. इतके सगळे प्रकार आसक्ति यांत येतात. ह्या भावनांना वश होणाऱ्या माणसाला कोणीहि नांवेंच ठेवील.

पण ह्याच्या उलट संन्यास म्हणजे तोहि प्रकार निंद्यच. अर्थात् पूर्ण संन्यास म्हणजे निष्कारण सुखासुखी त्याग. असा त्यागी हा प्रायः

अत्यंत अहंकारी असतो. त्यागानें त्याला खरें सुख लाभण्यापेक्षां त्यागाची प्रौढी मिरवणें हाच त्याचा मुख्य हेतु असतो. प्रेमानें व आदरबुद्धीनें जी श्रेष्ठता मिळत नाहीं, ती तुच्छताबुद्धीनें अधिक मिळतें असें त्याला वाटतें.

वरील दोन्ही एकांतिक प्रकार सारखेच वाईट. ह्या दोन्ही प्रकारचीं उदाहरणें किती तरी देतां येतील. पण एकाद दुसरें देऊनच भागविलें पाहिजे. तुम्हांला असा एकादा मनुष्य माहीत असेलच कीं ज्याच्याजवळ छानदार घोड्याची गाडी आहे, पण मोटारीचा हव्यास सफल होत नाहीं म्हणून तो खिन्न व रुष्ट असतो. द्रव्यलाभाच्या दृष्टीनें हजाराचें पाऊल लाखांत पडलें तरी त्याचें समाधान होत नाहीं. तो परांच्या गादीवर निजला तरी, चुकून कोठें ती गादी भरतांना एकादी सरकी राहिली असेल तर तिच्या संशयानें त्याला झोप येणार नाहीं. आणि साखरपाकांत भिजवून पुष्ट केलेली जिलबी तो खात असतां, पानावर द्रोणांत पाक मागून घेऊन ती बुचकळून खाल्ल्याशिवाय त्याला ती गोड लागत नाहीं.

अशींच दुसऱ्याहि बाजूचीं उदाहरणें. रोज परटाची खेप घरीं होत असतां ह्याचे कपडे मळलेले विटलेले. घरीं दोन नोकर असले तरी स्वतः हातांत पिशवी घेऊन मंडईत जाईल, व भाजीचें ओझें आणतांना चालून थकला तरी 'मला श्रम केल्याशिवाय बरेंच वाटत नाहीं' अशी प्रौढी मिरवील. जरीचा रुमाल डोक्याला चांगला बांधतां येत असून तो मुद्दाम वांकडा भोंगळ बांधील. कारण लोकांनीं याला संत साधु म्हणायला हवें ना! हेतु हें दर्शविण्याचा, कीं माणसापुढें पोषाखाची काय मातब्बरी? आणि शेवटचें उदाहरण द्यावयाचें तर तें ग्रीक स्टोइक, नव्हे सिनिक डायोजिनीस ह्याचें.

त्याचें घर नव्हतें किंवा त्याला तें मिळालें नसतें असें नाहीं. पण तुच्छताबुद्धि व मानभावी त्याग ह्याचें प्रदर्शन करण्याकरितां तो एका पिपांत बसे. अशा त्यागी मनुष्याची कीर्ति होते व त्यागप्रदर्शनावर राजेलोकहि मोहून जातात. कोणी नको म्हणतो असें कळलें कीं हे

'घ्या घ्या' म्हणून लागलेच त्याच्या पाठीस. असें सांगतात कीं, दिग्विजयी राजा अलेक्झांडर डायोजेनीसच्या भेटीला आला तेव्हां डायोजेनीसनें, राजपदाविषयीं तुच्छता दाखविण्याकरतां, आखडलेले पाय होते ते मुद्दाम लांब पसरिले. आणि राजाला म्हणाला 'चल बाजूला हो! मीं हात आखडले आहेत म्हणून पाय पसरले आहेत! तूं माझ्यावर सावली पाडून माझें ऊन काढून घेतोस!'

मी त्या अलेक्झांडरच्या जागीं असतों तर पिपांत बसणाऱ्या ह्या हलकट तत्त्वज्ञान्याला म्हटलें असतें कीं, 'बस्स झालें तुझें त्याग-प्रदर्शन! पीप हेंच जग मानणाऱ्या तुला उन्हाचें सुख तरी कशाला हवें रे? थंडीनें काकडून दोन दिवस आधींच मेलास तर काय वाईट? कारण जगणें हें तरी एक प्रकारचें सुखच आहे. जीवनासारखें दुसरें सुख कोणतें?'

पण या दोनहि अतिवादी पक्षांना त्याज्य ठरवून मध्यमक्रमांत गुणाचा उच्चांक साधणाऱ्या खऱ्या तत्त्वज्ञानाची जी उदात्त वृत्ति ती "आहे? आहे! नाहीं? नाहीं!" ह्या चार शब्दांत साठविली आहे. कारण हा काय म्हणतो तें पहा. तो म्हणतो 'सुखा, तूं प्राप्त आहेस? मला लाभणार? तुझी कृपा! तुझ्या स्वागताला मी सिद्ध आहे. सुखाचा आनंद चाखण्याची पात्रताहि मजमध्यें आहे. ये कीं, तूं व मी दोघे प्रेमळ सांगाती होऊं!' बरें, याच्या नशिबांत सुख नसलें तर तो म्हणणार, 'आहे? तर बरें! आणि नाहीं तर तेंहि बरेंच. सुखा! तूं लाभलेंस तर त्याचा किती आनंद मानावा, व न लाभलेंस तर किती खेद करावा, याचें प्रमाण माझ्या मनाला बरोबर साधलें आहे.'

'आहे आहे नाहीं नाहीं' याचा साधा अर्थ 'भागतें अडत नाहीं' असा होतो. पण यांतच सुखवादी भोगवादी तत्त्वज्ञान आणि निवृत्ति-वादी संन्यासवादी तत्त्वज्ञान यांच्या मध्यबिंदूवर छेद पडतो. तत्त्वज्ञानांतले ते दोन प्रसिद्ध वाद आहेत. प्रवृत्तिवादी तत्त्वज्ञान म्हणते 'जन्म हा नुसता जगण्याकरितां नव्हे तर आनंद व सुख भोगण्या-

करितां व त्याकरितां अवश्य ती सर्व प्रवृत्ति करण्याकरितां आहे.' संन्यासवादी तत्त्वज्ञान म्हणतें – 'नाहीं, जन्म हा परोपकार, सत्कृत्य, मोक्षलाभ इत्यादिकरितां आहे सुख भोगण्याकरितां नाहीं. इतर प्राणी सुखवादी असोत, पण मनुष्यानें त्याहून उच्च ध्येय धरलें पाहिजे!'

पण या दोघांच्या एकांगी तत्त्वज्ञानांत संपूर्ण किंवा खरें सत्य नाहीं. त्या दोन्ही तत्त्वज्ञानांचा समन्वय केला पाहिजे. तो होण्याचा मार्ग हा कीं, केवळ स्वार्थ ही भूमिका प्रवृत्तिवाद्यानें सोडून दिली पाहिजे, व केवळ निःस्वार्थ ही भूमिका संन्यासवाद्यानें सोडून दिली पाहिजे.

असें झालें म्हणजे आहे? आहे! नाहीं? नाहीं! या शब्दांतून कसा अर्थ निघतो पहा. पहिलें आहे यांतून भोगवृत्तीचा उद्गार निघतो व दुसऱ्या आहेंतून (उद्गारवाचक चिन्हासह) असल्याची किंमत नाहीं असा अर्थ निघतो. तसेंच पहिल्या नाहीं यातून खेदाचा ध्वनि निघतो तर उद्गारचिन्हासह दुसऱ्या नाहींतून त्यागवृत्तीचा—'नाहीं तर नाहीं जा माझें त्यावीण अडत नाहीं' असा ध्वनि निघतो.

मात्र उद्गारचिन्हापेक्षांहि मुखमुद्रा व हस्तविक्षेप यांनींच या शब्दांचा अर्थध्वनि अधिक चांगला व्यक्त होऊं शकेल.

आणि अमृतरायाच्या वरील पदांत याच मध्यमक्रमी तत्त्वज्ञानाचीं उदाहरणें आहेत. कसें तें पहा. ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यावरहि संसार टाकून दिलाच पाहिजे असें नाहीं. तो करतां आला वाहवा! तो न लाभला, लाभून बिघडला, तरीहि वाहवा! ब्रह्मज्ञान्यानें संसाराची निंदा करूं नये पण संसाऱ्यानेंहि त्याची आसक्ति धरूं नये. गरजेची उपेक्षा याचेंच नांव 'अनासक्ति योग'. सुखसेवनाचें मानसिक इंद्रिय बोथट झालेलें नाहीं; सुख लाभलें तर गोगलगाय आपलीं शिंगें पुढें करून पदार्थाला स्पर्श करते त्याप्रमाणें हा सुखाचें सेवन करील. पण सेवन करण्याला सुख नाहीं, तर गोगलगाय किंवा कांसव जशीं आपलीं शिंगें व इंद्रियें आवरून घेऊन आपल्या जाड कवचींत सुरक्षित राहतात, त्याप्रमाणें सुख नाहीं म्हणून हा अनासक्तियोगी खेद न करतां आत्मानंदांत गर्क राहील.

वरील अमृतराय कवीच्या पद्यांतील 'आहे आहे नाहीं नाहीं' या विधानांत गरजेच्या उपेक्षेचेंच महत्त्व प्रदर्शित केलेलें आहे. गुरुकृपा म्हणा वैराग्य म्हणा—तें लाभलेला मनुष्यहि संसार करतोच, पण कसा उदासीन मनानें करतो, हें अमृतराय कवीच्या पदांत वर्णिलें आहे. असलें तर वाहवा नसलें तरी वाहवा! संध्याकाळीं दिव्यास तेल असलें तर देवासमोर बसून त्याला न्याहाळीत भजन करावें. नसलें तरी अंधारांत टाळ्या वाजवीत भजन करतां येतेंच कीं. अंधार असला तरी टाळी पडूं शकते. हातावर मारण्याचा हात अंधारामुळें आपल्या किंवा दुसऱ्याच्या गालफडावर पडत नाहीं.

पण दिव्याचें तेलच कशाला! हल्लीं विजेच्या प्रकाशाचेंहि तसेंच झालें आहे कीं नाहीं? घरच्या दिव्यांवर कागदी झाकणें पडलीं. रस्त्यावरच्या दिव्यांवर जस्ती झाकणें आलीं. म्युनिसिपालिटी नसणाऱ्या गांवांतून, किंवा नादान म्युनिसिपालिटी असणाऱ्या कांहीं गांवांतून, रस्त्यांमधून जितका अंधेर पडतो तितका अंधार आज पुण्यामुंबईच्या रस्त्यांत पडतो. तरी लोकांचा व्यवहार थांबला आहे काय? पेट्रोल तेलाच्या नियंत्रणामुळें मोटारींना आतां तबेल्यांत बसून पुष्कळशी विश्रांति मिळते कीं नाहीं? आणि तीसचाळीस वर्षांपूर्वी तर मोटारी होत्याच कुठें?

तो पहा भिकारी किंवा सत्याग्रहांतला कैदी मातीच्या भांड्यांतून पाणी किती आनंदानें पीत आहे. भांडें पितळेचें, रुप्याचें मिळालें तर त्याला नको का आहे? दिलें तर तो तें टाकील असें नाहीं! पण तें नाहीं म्हणून मातीच्या भांड्यांतून पाणी पिऊनहि त्याच्या तोंडावर तृषा भागल्याच्या समाधानाचा तजेला आहे. हाच भोगवादी असता तर मातीचें भांडें पाहून तोंड वाईट कर करून तें पाणी पिता किंवा रागानें तें फेकून देऊन तहानेनें जीव व्याकुळ होईपर्यंत थांबता. या भिकाऱ्याला उद्यां श्रीमंती आली, तो सत्याग्रही कैदी बंधमुक्त होऊन घरीं गेला, तर चांदीच्या भांड्यानें अवश्य पाणी पिईल. पण म्हणेल तेव्हां मातीच्या भांड्याशिवाय गत्यंतर नव्हतें म्हणून त्यांतून पाणी

प्यालों, पण आज चांदीचा पेला असल्यावर मातीचेंच भांडें मी कां वापरीन ! निरपवाद भोग मिळाला तर तो अवश्य भोगीन. पण तो न मिळाला म्हणून जर मी खिन्न झालों तर माझ्या मनापेक्षां त्या भोगाचीच किंमत अधिक ठरेल. तें नाहीं आपल्याला खपणार !

---

## हत्तीचें कातडें वापरा ! १२

मुंबईच्या उपनगरांत राहून लोकल ट्रेननें फोर्टमध्यें जाणाऱ्या लोकांना एक खोड असते. ती ही कीं, ते अगदीं आत्यया वेळीं मोजक्या मिनिटाला घराहून निघतात, धांदलीनें स्टेशन गाठतात, आपणांपूर्वींच आगगाडी येऊन स्टेशनांत उभी राहिलेली पाहून कोसळल्यासारखे जिन्यावरून धावत उतरून डब्यांत शिरतात, आणि मग धापा टाकीत उपरण्यानें कपाळाचा घाम पुसून वारा घेतात.

मग यापेक्षां पांच मिनिटें आधींच घर सोडलें तर? नाहीं. कारण 'स्टेशनांत गाडी आल्यावर मी घरून निघालों तरी गाडी मिळते' अशी टाइमबाजपणाची खोटी चढाई मारायला एरवीं कशी सापडणार?

मी यांतलाच एक. पण आज 'करटावर आवाळू' उठावें तसें झालें. तोंडात सिगारेट पकडून, स्टेशनावर निघण्याकरितां, धांदलीनें घरांतून बाहेर पडलों आणि पन्नास साठ पावलें गेल्यावर सहज हात खिशांत गेला तों रेल्वे पास ठेवलेलें पैशाचें पाकीट खिशांत नाहीं!

झालें. क्षणभर अनिश्चयानें गोंधळलों. त्याच क्षणीं उजव्या हातच्या घराशीं बसलेलें मांजर मला भिऊन उठलें, आणि धावत माझ्या समोरून डावीकडच्या कुंपणांत गेलें.

रेल्वे पास आणि पैशाचें पाकीट दोनहि घरीं ठेवून ऑफिसांत जाणें योग्य नाहीं, असें ठरवून मी तोंड फिरवून मागें घराकडे निघालों. मनांत म्हणालों, "ही गाडी चुकली तर दहा मिनिटांनीं पुढची आहेच. कचेरींत हजेरीपटावर सही करायला फार तर दहा-पांचच मिनिटें उशीर होईल!"

मांजर माझ्या पुढून गेलें त्या क्षणीं मी मागें फिरलों, आणि याच क्षणीं उजव्या हातच्या घराच्या गॅलरींतील दोघी नवतरुणी इतक्या मोठ्याने हसल्या, कीं तें हसणें माझ्या कानांतून काळजांत घुसलें.

मी परत घरीं आलों. रेल्वे पास व पैशाचें पाकीट घेऊन स्टेशनावर गेलों. दुसरी गाडी गाठली, आफिसांत गेलो—सर्व कांहीं ठीक झालें. पण दिवसभर मन अस्वस्थ होतें. कां तर दोन निष्कारण गैरसमज झाले त्यांचें निराकरण करणें शक्य नव्हतें.

तुम्ही हसूं नका! पण पहिला गैरसमज सकाळच्या त्या मांजरासंबंधीं. मी घाईनें आपल्या कामाला निघालेला, घराशीं निमूटपणें बसलेल्या त्या मांजराला मी का मारीन? पण मांजराची तशी समजूत झाली म्हणूनच तें भिऊन पळालें ना! कुणालाहि निष्कारण भीति उत्पन्न करणें हा अपराध होय. तो मीं कांहीं जाणूनबुजून केला नव्हता. पण मांजराला तसें वाटलें ना? त्याचा गैरसमज मला दूर करतां आला तर किती बरें वाटेल? पण त्याची माझी भेट होणार कशी? आणि झाली तरी मी माझा खुलासा त्याला समजून सांगणार कसा? मग हें निष्कारण गैरसमजाचें शल्य शिल्लकच राहिलें कीं नाहीं?

पण दुसरा एक गैरसमज झाला तो मात्र मनाला लागून राहण्यासारखा. मांजर आडवें जाण्याला, आणि मला घरीं विसरलेल्या पासाची व पाकिटाची आठवण होण्याला, एकच गाठ पडून तीं आणण्याकरितां मी परत फिरलों हें वास्तविक सत्य असतां, गॅलरींतल्या त्या दोन सुधारक तरुणींना मात्र वाटलें कीं, मांजराच्या अपशकुनाला भिऊन मीं परत फिरलों! मी एकटा सुशिक्षित, मुंबईत राहणारा, सूट-

पाटलोणवाला, हॅट घालणारा, सिगरेट ओढणारा, नवजवान—आणि मांजर आडवें गेल्याचा अपशकुन मानतों! धिक्कार माझ्या शिक्षणाला! ‘व्हॉट ए सुपरस्टिशिअस फूल!’ असें नसतील का त्या तरुणी मनांत म्हणाल्या? त्या तसें मनांत म्हणाल्याशिवाय का येवढ्या मोठ्यानें हसल्या?

मग या अपमानाचें निराकरण कसें होणार? मांजराचा गैरसमज घालविणें शक्य नव्हतें, कारण माझी भाषा त्याला कळण्यासारखी नव्हती. या स्त्रियांना मीं खरा प्रकार समजून सांगितला तर सहज कळेल, मग त्या विश्वास ठेवोत वा न ठेवोत. पण यांत अडचणीच होत्या. पहिली ही कीं, परक्या तरुणींशीं आपण होऊन बोलणें काढावयाचें! त्याचा त्यांना राग आला तर? माझा खुलासा बाजूलाच राहिला, पण लघळपणाला कांहीं निमित्त हवें म्हणून मीं हा मांजराचा विषय काढला असा त्यांचा ग्रह झाला तर? बरें तसली अनुदार कल्पना त्यांनीं न केली, पण मीं समजलों त्याप्रमाणें त्यांना मी मांजराच्या अपशकुनाला भ्यालों असें खरोखर वाटलेंच नसलें, तर? त्या मला लघळ चावट न म्हणाल्या तर आचरट म्हणतील! कदाचित् त्या आपआपसांतील संभाषणांत निघालेल्या विनोदी कोट्यांना, किंवा संभाषणविषय झालेल्या इतर एखाद्या मूर्खाला, हसल्या नसतील कशावरून?

आणि हो, आणखी सांगायचें राहिलेंच कीं,—तें मांजर खरोखर मला भिऊन पळालें नसून, दुसऱ्या बाजूला दिसलेल्या खाद्य पदार्थाला पाहून धावलें नसेल कशावरून!

इतके सगळे पर्याय लक्षांत आल्यावर मीं तो विषय मनांतून काढून टाकला. एकदां वाटलें कीं, फिरून त्या मागच्या ठिकाणीं तेंच मांजर आडवें जावें, व त्याला न जुमानतां मीं तसेंच ऐटीनें पुढें जावें, आणि त्या गॅलरींतल्या त्या स्त्रियांनीं तें पाहावें, म्हणजे काय बहार होईल!

पण एकदां घडलेली गोष्ट पुन्हा तशीच कुठें घडत असते? त्या मांजराचा व त्या स्त्रियांचा गैरसमज तसाच राहूं द्यावा हाच उत्तम मार्ग! असा विचार करून मीं मनाचें समाधान केलें.

पण असले गैरसमज होतच असतात, व त्यांच्या खुलाशाच्या भानगडींत पडूं नये असें वाटण्यासारखीं लवकरच आणखी दोन उदाहरणें घडलीं!

संध्याकाळच्या सुमाराला मी ग्रँट रोडजवळच्या एका रस्त्याच्या फूटपाथवरून चाललों होतों. माझ्यापुढें चार हातांच्या अंतरावर दोघी स्त्रिया हातांत हात घालून चालल्या होत्या, व आपापसांत बोलत हसत होत्या. त्यांच्या खोप्यांत मोठे फुलांचे गजरे असून त्यांचे पदर खांद्यावरून निघालेले होते. त्यांच्या पायांत जरतारी सपाता असून ठेक्यावर ऐटबाज पावलें टाकीत त्या चालत होत्या. आणि तोंडांत चघळणाऱ्या विड्यांची पीक मधून मधून बाजूला थुंकीत होत्या. इतक्यांत मला खोकल्याची उबळ आली, व ठसका लागून मी दोन-तीन वेळां मोठ्यानें खोकलों. तें ऐकून त्या दोघींनीं मागें वळून मोठ्या भेदक मुद्रेनें मजकडे पाहिलें. आणि त्यांच्यामागून मी चालत होतों तें उलटवून मला पुढें काढावें या हेतूनें, त्यांनीं आपली गति मंद केली. अर्थात् पूर्वींचे त्यांच्या-माझ्यांतलें अंतर तुटून मी त्यांना मागें टाकून पुढें गेलों. पण त्यांच्या जवळून मी जातांना मला ऐकूं जाईल असें मोठ्यानें त्यांतली एकजण म्हणाली, 'पुरुषांची जातच निर्लज्ज! कुणा पाठमोऱ्या स्त्रियांचे चेहेरे पाहण्याची यांना इच्छा झाली कीं यांना खोकला ठेवलेलाच! असं वाटतं कीं, पायांतली पैजार काढून अंगभर मार द्यावा.'

हे शब्द मीं स्पष्ट ऐकले व मला उद्देशूनच ते होते यांत शंकाच नव्हती. एक वेळ वाटलें कीं क्षणभर मुद्दाम थांबून त्यांचा हा गैरसमज दूर करावा! पण न जाणो त्यांना माझा खुलासा खरा न वाटून त्या मला आणखी गालिप्रदान करावयाच्या, किंवा कदाचित् पोलिसाला हाक मारून माझी शोभा करावयाच्या! सुदैवानें इतक्यांत

ट्रॅम थांबलीशी पाहून मीं चटदिशीं ती पकडली. पण किती तरी वेळ मन अस्वस्थ होतें. त्या स्त्रिया आपल्या अशातशाच होत्या. पण त्यांच्या निंदेचा प्रतिकार करतां येईना !

आणखी एकदां अशीच मौज झाली. एकदां कर्नाटकच्या बाजूला प्रवास करतांना डाळिंबांच्या लागवडीची गोष्ट निघाली. माझा मित्र म्हणाला, "डाळिंबांना पक्ष्यांचा फार उपद्रव होतो. प्रत्येक फळाला कागदी पिशव्या घालून संरक्षण करावें लागतें. कोण हा त्रास !"

मी म्हणालों 'याला उपाय आहे. सांगतों.' इतक्यांत एका लहानशा स्टेशनवर गाडी थांबली. दोघे कर्नाटकी जवान प्रवासी डब्यांत चढून आमच्या बाकावर येऊन बसले. गाडी पुन्हा चालू झाली, तेव्हां मित्रानें स्मरणपूर्वक पुन्हा तो विषय काढल्यामुळें मी म्हणालों, 'हं. उपाय सांगत होतों तो असा. रॉकेलच्या रिकाम्या डब्यांत लहानमोठे दगड घालावे व ते खूप वाजवावे ! हें ऐकतांच त्या दोघांतला एक प्रवासी उसळून म्हणाला, 'कानडी भाषेची थट्टा, आणि आमच्यापुढें ? तुमच्या कोल्हट्टकरांनीं कानडी भाषेची थट्टा केलेली प्रसिद्ध आहे. म्हणे—डब्यांत खडे घालून वाजविल्यासारखी कानडी भाषा ऐकणाराच्या कानाला लागते ! ते कोल्हट्टकर मरून गेले, सुटले. पण त्यांच्या त्या शब्दांनीं कानडी भाषेची अशी टवाळी कोणी केलेली ऐकली तर आम्ही त्याचा खरपूस समाचार घेऊं, लक्षांत ठेवा.'

आम्हां दोघांनाहि आश्चर्य वाटलें. मीं त्या कर्नाटकी तरुणाला म्हणालों, 'अहो, येथें कानडी भाषेचा संबंध कुठें आला ? माझा मित्र डाळिंबाच्या बागेच्या गोष्टी बोलत होता. आणि मी त्याला डाळिंबांच्या फळांचें संरक्षण करण्याचा उपाय म्हणून डब्यांत खडे घालून वाजविण्याची युक्ति सांगत होतों.'

'तर तर !' तो कानडी तरुण क्रोधाचे हातवारे करून म्हणाला, 'आम्हां कानडी लोकांना पाहतांच बऱ्या तुम्हांला डाळिंबांच्या गोष्टी सुचल्या ? आम्हांला काय मूर्ख समजतां ?'

आतां मी काय बोलणार ? मुकाट्यानें बसलों. म्हणालों, ' तुमचा निवळ गैरसमज झाला आहे. पण हें खरें वाटत नसेल तर तुमची माफी मागतों कसा !'

अशीच आणखी एक लहानशी गंमत. एकदां भायखळा पुलावरून जातांना कपाळाला खाज सुटली म्हणून खाजविण्याकरितां कपाळाला हात लावला. तोंच समोरून एक गोरा सोजीर येत होता. त्यानें माझ्याकडे पाहिलेंहि नाहीं. पण जवळून जाणारे दोघे बोडक्या डोक्याचे, पायघोळ पोकळ विजारी घातलेले, चटोर विद्यार्थीभाई म्हणाले, ' हे पहा मवाळाग्रणी ! फाटका सोजीर समोर दिसला तरी त्याला सलाम करणारे ' ?

मी मनांत म्हणालों, 'आतां जुलूम झाला !' खुलासा करून समजूत पटविण्यापलीकडे असणारे ते उर्मट तरुण पाहून, कांहीं न बोलतां आपल्याशीं हसत पुढें गेलों झालें.

आणि मग इतक्या अनुभवानंतर मनाशीं ठरविलें कीं, अशा अभावित होणाऱ्या अटळ गैरसमजांच्या काळजीनें मी वाळूं लागलों, तर कांहीं काळानें माझें हें शरीर जाग्यावर राहणार नाहीं. पूर्वीं आलेल्या या अनुभवांचा दोनहि दृष्टींनीं शांत विचार केला तेव्हां मनाला हें पटलें कीं या गैरसमजांपैकीं एकहि मला टाळतां आला नसता. त्या त्या प्रसंगीं मजकडून घडलेल्या वर्तनांत माझ्याकडून कांहींच चूक नव्हती. माझें वर्तन सर्वस्वीं बरोबर असतांहि दुसऱ्याचे गैरसमज होतात. बरें, दुसऱ्याचा केव्हांहि कसलाहि गैरसमज होऊं न देण्यासारखें मी आपलें वर्तन ठेवीन असें व्रत मीं मनानें घेतलें तरी तें तडीला कसें जाणार ?

मग—

आहे, एक गोष्ट शक्य आहे. पूर्वींच्या या प्रसंगांत ज्यांनीं आपला गैरसमज विनाकारण करून घेतला त्यांनीं असा विचार करायला पाहिजे होता कीं, मीं तिऱ्हाईत माणूस, त्यांचा असा अपराध विनाकारण कां करीन ? प्रत्येक प्रसंगीं मला प्रथम निरपराधी असें समजून

त्यांना चालतां आलें असतें. अपराध शाबीत होईपर्यंत आरोपीला न्यायकोर्ट निरपराधीच समजतें !

हो—पण यांत चूक माझीहि झाली नसेल कशावरून ? तें मांजर मला भिऊन दुसऱ्या बाजूला गेलें असें समजण्यांत मीं त्याच्यावर भ्याड-पणाचा खोटाच आरोप केला नसेल कशावरून ? आणि ग्यालरींतल्या त्या स्त्रिया आपापसांतील विनोदामुळेंच हसल्या नसतील कशावरून ?

एकंदरींत काय ? कोणाची खोडी आपण होऊन न काढण्याची बुद्धि नेहमीं धरावी. पण आपण स्वतः असे वागत असल्यावरहि जर विनाकारण दुसऱ्यानें गैरसमज करून घेतला—तर मग ? खुशाल मन निगरगट्ट करावें. जगाशीं वागतांना अगदीं गेंड्याचेंच नसलें तरी हत्तीचें कातडें थोडेंसें पांघरून वागावें ! इतर सर्व जग निरुपद्रवी, सालस होईल तेव्हां सावकाश पाहतां येईल ! सर्व जगाचें आपल्या-विषयीं चांगलेंच मत असावें अशी अपेक्षा धरील तो मूर्ख ठरेल व दुःखीहि होईल.